


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३४१

जुलै ते सप्टेंबर २०१२

डॉन क्विक्झोट (१६०५) - सर्व्हांटिस.

अनुक्रमणिका






## GOLD and SILVER SAVINGS ACCOUNTS

### GOLD SAVINGS ACCOUNT

• Sweep in and Sweep out facility for all • Funds transfer through NEFT free • RTGS free • ATM usage at any bank free • Multicity cheques free • Personalised cheques free • PA insurance upto Rs. 5 lakhs free • Online equity trading facility • Online utility bills and Tax payment free • Preferential rate for Gold coins • Demat account opening charges free • PAN/TAN facilitation

### SILVER SAVINGS ACCOUNT

• Sweep in and Sweep out facility if average balance is Rs. 25,000 and above • Overdraft facility upto one month's salary • Funds transfer through NEFT free • RTGS free • ATM usage at any bank free • PA insurance upto Rs. 1 lakh free • Online utility bills and Tax payment free • PAN/TAN facilitation

## SUPER and CLASSIC CURRENT ACCOUNTS

### SUPER CURRENT ACCOUNT

• Issue of DD @ 50% concession • Folio Charges free • Outstation cheques collection @ 50% concession • RTGS @50% concession • Multicity cheques free • Personalised cheques free • PA insurance upto Rs. 5 lakhs free • Funds transfer through NEFT free • Online utility bills and Tax payment free • Online equity trading facility • Demat account opening charges free • PAN/TAN facilitation

### CLASSIC CURRENT ACCOUNT

• Issue of DD @ 50% concession • Folio Charges @ 50% concession • Outstation cheques collection @ 25% concession • RTGS @ 25% concession • Multicity cheques @ 25% concession •Personalised cheques upto 100 leaves free • PA insurance upto Rs. 1 lakh free • Online utility bills and Tax payment free • PAN/TAN facilitation

• Conditions Apply

**And host of other concessions and value additions**



**इण्डियन ओवरसीज़ बैंक**
**Indian Overseas Bank**
Good people to grow with

For further details, please contact your nearest IOB branch or log on www.iob.in Toll Free : 1800 425 4445

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३४१ जुलै ते सप्टेंबर २०१२






**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरभाष ०२०-२४४७५९६३
(कार्यालयाची वेळ : सकाळी ९.३० ते ११.३० दुपारी ४.३० ते ७.३०)

अनुक्रमणिका








# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**प्रा. मिलिंद जोशी,**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**एच्. एम्. टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

कव्हर डिझाईन : **श्री. हेमंत सरदेसाई**
भ्रमणभाष : ९३२६०७०९३४

**किंमत : १५/- रुपये**

प्रकाशन : सप्टेंबर, २०१२

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*

संपादकीय

# 'फांकडे तरवारबहाद्दर!'

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

*('डॉन क्विक्झोटचे' रूपांतर)*

'महाराष्ट्र-भाषा चित्रमयूर' या पदवीने ज्यांना ओळखले जात होते; त्या कृष्णाजी नारायण आठल्ये यांनी, १९२१ ते २५ या काळात, मूळ स्पॅनिश कादंबरीकार 'सर्व्हांटिस' – (Cervantes) याने लिहिलेल्या 'डॉन क्विक्झोट' (Don Quixote) या उपहासगर्भ कादंबरीचे मराठीत रूपांतर केले. हे रूपांतर सुमारे ९० वर्षांपूर्वीचे असले, तरी त्यातील उपहास आणि उपरोध आजही विचार करायला लावणारे आहेत. तशी ही कादंबरी इ.स. १६०५ मध्ये स्पॅनिश भाषेत प्रसिद्ध झाली, या काळात स्पेनचे वैभव आणि सामर्थ्य युरोपखंडात सर्वश्रेष्ठ होते. स्पॅनिश-तुर्क युद्धात सर्व्हांटिस काही काळ शिपाई होता; आणि त्याच्या शौर्यामुळे सेनापतीने त्याचा सत्कार केला होता. सर्व्हांटिसचे वडील फिरते वैद्य होते. त्यांच्याबरोबर त्याने खूप प्रवास केला; आणि त्यानिमित्त माणसांचे बहुविध अनुभव घेतले. त्याला ग्रंथवाचनाचे, विशेषत: ऐतिहासिक ग्रंथवाचनाचे, वेड होते. त्याने काही काळ शिक्षकाचीही नोकरी केली, त्यात तो रमला नाही. त्याने नाटके लिहिली. तेथेही यश मिळाले नाही. पुढे करवसुलीच्या कामावर असताना सक्तीने करवसुली करणारा या आरोपाखाली त्यास तुरुंगवास भोगावा लागला. या तुरुंगवासाच्या काळात त्याने हे जगप्रसिद्ध पुस्तक 'डॉन क्विक्झोट' लिहिले. एकेकाळी तलवार गाजविलेल्या घराण्यातील, पुढच्या पिढीचे निष्क्रिय वारसदार आणि त्यांचे खुषमस्करे पोकळ बडेजावातच धन्यता मानतात. पूर्वजांच्या पराक्रमाच्या गाथा गाण्याचा अतिरेक करणारा स्थितिप्रिय समाज वर्तमानकाळात अपयशी ठरतो. इतकेच नव्हे; तर विक्षिप्त ठरतो. बेगडी शिलेदारीच्या आणि पराक्रमाच्या स्वप्नरंजनातील निष्क्रिय समाज, जुन्या प्रेरणेतून नवसमाज निर्माण करण्याची क्षमता गमावून बसतो; फजित पावतो. याचे उपहासगर्भ कथानक म्हणजे सर्व्हांटिसचा 'डॉन क्विक्झोट'. तीनशे वर्षांनंतर १९२१ ते २५ मध्ये त्याचे रूपांतर – 'फांकडे तरवारबहाद्दर' या नावाने करणारे महाराष्ट्र भाषा चित्रमयूर कृ. ज. आठल्ये यांनी केवळ मनोरंजनार्थ हे काम केले नसावे. आठल्ये यांचा काळ मनोरंजन ग्रंथमालेचाही होता. ऐतिहासिक कादंबऱ्यांनी एक 'रोमँटिक फॉर्म' घेतला होता. बखरी, पोवाडे, मुक्तेश्वरादि पंडितांच्या काव्याने व कथाकारांनी एक 'रोमँटिक' कथाकाळ निर्माण केला होता. कांचनगडाची मोहना, मुक्तामाला, मंजुघोषा, अरेबियन नाईट्स, राजपुत्र आणि राक्षसांच्या कथा इ. मनोरंजनपर साहित्याचा फार मोठा वाचकवर्ग होता. त्यात भर म्हणून की काय, संगीत नाटकाच्या काळानेही चोरपावलांनी पुराणकथा, 'रोमँटिक' स्वरूपात, अभिजनांसमोर उभ्या केल्या. धनुर्धारी अर्जुन, 'सौभद्र'मध्ये प्रियकर बनून प्रेमविव्हळ होतो; तर चक्रपाणी श्रीकृष्ण 'प्रिये पहा, रात्रीचा समय सरूनि येत उषःकाल हा...' म्हणून प्रियेचा रुसवा काढण्यासाठी आर्जवे करतो; आणि आपल्या चुकीचे प्रायश्चित्त घेण्यासाठी अनेक शृंगारिक कृतींचा बिनधास्त उल्लेख करतो. संगीत नाटकाचा सुवर्णकाळ ही साहित्याची जशी जमेची बाजू आहे; तशी स्वप्नाळू पिढी निर्माण केल्याची उणी बाजूही अभ्यासली पाहिजे. सुंदर व्यक्तिमत्त्वाच्या कवि शेलेचा प्रभाव पाश्चात्त्य तरुणांमध्ये इतका होता की, शेले सारखेच दु:खी, (melancholy) दिसणे, त्याच्यासारखीच केशरचना करणे... इ. वेड्याचाळ्यांनी एक काळ प्रभावित झाला होता. सारांश काय, तर कृ. ज. आठल्यांसारख्या विद्वानाने 'डॉन क्विक्झोट'ला





अनुक्रमणिका

'फांकडे तरवारबहाद्दर' नावाने मराठी साहित्यात रूपांतराने का आणला, त्यामागची प्रेरणा जाणून घेणे आजही आवश्यक वाटावी. त्याची कालचरित्रात्मक समीक्षा केली पाहिजे; कारण कलाकृतीतील जीवनाच्या गर्भित अनुभवाचा अर्थ लावणे, हीच तर समीक्षेची अट आहे.

'फांकडे तरवारबहाद्दर' हे डॉन क्विक्झोटचे रूपांतर आहे. या कादंबरीचे मराठी रूपांतर करताना जो तत्सम कालखंड निवडला त्याचे विश्लेषण मुद्दामच वरील परिच्छेदात केले आहे. कथानक आणि पात्रे यांना, त्यामागील उपरोधाचा भाग न बिघडवता, चपखल एतद्देशीय स्वरूप दिले आहे.

इतिहासकालीन सरदारदरकदारांची संस्थानिक म्हणून काय अवस्था झाली होती. त्याचे वर्णन निबंधमालाकारांनी 'आमच्या देशाची स्थिती'त परखडपणे केले आहे. 'आमच्या राजेरजवाड्यांची सध्या मोठी विलक्षण स्थिती झाली आहे. इंग्रज लोकांनी सगळा कारभार आटोपल्यामुळे यांनी चारही ठाव जेवावे व मन मानेल तितका ऐषआराम करावा एवढेच यास हल्ली काम उरले आहे. मागे वारंवार परचक्राचे भय असे. तेव्हा आतासारखी चैन भोगण्यास फुरसतच नसे; नेहमी घोडा, भाला यांशी काम ठेवावे लागत असे. आता परचक्राची पिढ्यानुपिढ्याही वार्ता नसल्यामुळे 'सुखं च मे, शयनं च मे' एवढा काय तो प्रकार उरला आहे. इंग्रजीत एक म्हण आहे की – 'रिकामे मन सैतानाचा कारखाना'... या म्हणीचे पूर्ण सार्थक्य हल्ली आमच्या संस्थानिकांच्या ठायी सापडेल. मद्यपान, व्यभिचार, अनन्वित आचार, वगैरे सर्व काही अनर्थ जिकडे तिकडे ऐकण्यात येतात... राजेरजवाड्यांची ही अवस्था तर सामान्य लोकांचे काय? 'लोकांस आपल्या सामान्य हक्काचे व सामान्य गोष्टीचेही ज्ञान नसून, त्यांच्या अभावी त्यांची स्थिती पशुवर्गासारखी होऊन गेलेली... आमची मर्दुमकी असली की, रडतरावाप्रमाणे आम्हाला घोड्यावर बसवून शिवाय आमच्या हातून लोकांनी तरवारही मारली पाहिजे...' ज्यांच्या घरात कुणीतरी तरवार गाजविली असेल; त्याचे वारस नाकर्ते झालेले! ते पराक्रमाच्या मोहिमेच्या स्वप्नरंजनात व्यवहार विसरले आणि हास्यास्पद ठरले. युद्धाला जाणारा लवाजमा शाही शिकारीच्या षौकात सेवा करू लागला.

'फांकडे तरवारबहाद्दर'चा नायक – धोंडबा गायतोंडे असाच आपल्या घराण्याने गमावलेल्या शिलेदारी पेशातून, आपल्या सरंजामातून बाहेर पडायला तयार नाही. आपल्या घराण्याच्या शौर्यगाथेतच त्याने स्वत:ला बांधून ठेवले. बदललेल्या निष्ठुर काळाची त्याला जाणीवही नाही! मिशीला तूप लावून हालाखीत जगणे सुटत नाही. वैभव जाऊन घरात अठराविसवे दारिद्र्य आले तरी आपली आजाच्या वेळची गंजलेली तरवार, मोडका भाला, पाठीला फाटकी-तुटकी ढाल, जुना रूदार अंगरखा व चोळणा, शिरवळघाटी जोडा, बसायला मरतुकडे हरदासी तट्टू आणि शिपाईगिरी पगडी! या वेषात ते काल्पनिक मोहिमेवर निघत. मनोरंजन मालेतील आणि बखरी-कादंबऱ्यांमधील वाचलेल्या लढाया, स्वाऱ्या, मारामाऱ्या, गांजलेल्या लोकांना दु:खमुक्त करणे, 'गड आला पण सिंह गेला' मधील कमलकुमारी आणि देवलदेवी किंवा 'कांचनगडची मोहना' यासारख्या सुंदर तरुणींना जुलमी किल्लेदाराच्या तावडीतून सोडविणे, राक्षसाच्या राज्यातून राजकन्येची सुटका करणे... या 'रोमँटिक हीरो'च्या भूमिकेतील स्वप्नवेडा, खुळा धोडिंबा या मनोराज्यात धोंडिबा मांजरमारे – लांछनगडकर होतात; आणि म्होतुर लावलेली तुळसा – 'मोहना महाराणीसाहेब मांजरमाऱ्या लांछनगडकरीण' होतात. लुकडा शिरवळी तट्टू – रतनघोस या नावाने उमदा घोडा होतो. पंचपंच उष:काली मोहिमेवर निघालेल्या धोंडबाला मेंढरांचा कळप म्हणजे शत्रूचे सैन्य दिसते. त्याच्यावर चालून गेल्याने २-४ मेंढरे गारद होतात. मग मेंढपाळांच्या हातचा बेदम मार म्हणजे युद्धातील शूराच्या जखमा होतात. पुढे खाणावळ म्हणजे किल्ला, खाणावळीचा मालक म्हणजे किल्लेदार होतो. त्यांच्या पदरी हा बारगीर, रात्रभर काल्पनिक किल्ल्याचा पहारेकरी होतो. अशा अनेक काल्पनिक मोहिमा तो गाजवतो आणि प्रत्येक वेळी वेगवेगळ्या लोकांकडून

बेदम मार खाऊन घरी येतो. म्हणजे युद्धात जखमी होऊन येतो. त्याच्या शरीरावरील जखमा म्हणजे वीरभूषणे! त्यात त्याला शंकू वंजाऱ्याची साथ मिळते...

वास्तवातल्या दरिद्री, दुबळ्या, खुळ्या धोंडबाला शूर सरदारकीची दिवास्वप्ने पाहाण्यात धन्यता वाटते. धोंडबाला खोट्या दुनियेत घेऊन जाणाऱ्या आणि खुळे करणाऱ्या बखर-कादंबरी-शूरवीरांच्या कथा-पंचतंत्र, हितोपदेश, अरेबियन नाईट्स इ. सर्व कल्पनारम्य रोमँटिक पुस्तकांचा अंगणात ढीग करून त्याची पत्नी, गावातील परसू न्हावी आणि ग्रामजोशी हे सगळे मिळून, ग्रंथांची होळी करतात. त्यांच्या मते ही सर्व बुके शहाण्याला सुद्धा बहकवणारी आहेत. मनोरंजन मालेच्या कल्पनारमणीय सुखभासमय 'नावलांची' ही कीड आहे. त्यातील अद्‌भुतरमणीयता आणि योगायोगावर आधारलेल्या कादंबऱ्या माणसाला स्वप्नाळू दुनियेत गुंगवून ठेवतात; आणि वास्तवतेच्या उच्चतम कलाबीजापासून वंचित होतात; असे रावबहाद्दर का. बा. मराठे यांचे मत त्यांच्या 'नावल व नाटक – त्याविषयी निबंध' या छोटेखानी पुस्तकात जाहीर झाले होते. सदर निबंध त्यांनी ज्ञानप्रसारक सभेसमोर १९२२ मध्ये वाचला होता. तो सर्वांना माहिती आहे. कल्पनाविश्वात नेणाऱ्या पोकळ खोट्या कथानकाविषयीची चीड त्यातून व्यक्त झाली आहे. कारण त्यातून विचारी पिढी निर्माण होण्याऐवजी खुळी स्वप्नाळू पिढी निर्माण करण्याला या कल्पनारमणीय कादंबऱ्या आणि नाटके जबाबदार असून, त्यांनी पिढीचे नुकसान केले; असा एक विचारप्रवाह होता. धोंडबाच्या पत्नी आणि हितचिंतक, धोंडिबाच्या स्वप्नाळू अवस्थेला कारणीभूत असलेल्या, कल्पनारमणीय ग्रंथांची होळी करतात. 'फांकडे तलवारबहाद्दर' या कादंबरीतील हा प्रसंग, तत्कालीन एका विचारप्रवाहाची सूचना देणारा आहे. निष्क्रिय स्वप्नाळू पिढीचा केलेला तो भिडणारा उपहास आहे.

---

संपर्क : ७ 'सूर', गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५
भ्रमणभाष : ९७६७६९९३१९

आजही रंजक-देमार चित्रपट आणि टीव्ही 'सीरियल' मधून स्वप्नाळू पिढी निर्माण होत आहे काय? गुन्हेगारीचे भ्रष्ट राजकारण, करोडो रुपयांचे घोटाळे, घृणास्पद रेव्ह पार्ट्या, एका रात्रीत श्रीमंत होण्यासाठी बालकांचे अपहरण आणि खून, अल्पवयीन मुलींवर बलात्कार करणारे सभ्यतेचा बुरखा पांघरून देशाचे नेते होऊ पाहतात. सद्‌विचाराने प्रेरित झालेल्या भ्रष्टाचारविरोधी आंदोलनाची शोकांतिका इ. अनेक प्रकारांनी आजचे भ्रष्ट गुन्हेगारी कालचरित्र माणसाला अस्वस्थ करीत आहे. समाजपुरुष होऊ पाहणारे आणि आतून भ्रष्टाचाराने किडलेले 'फांकडे तरवारबहाद्दर' नव्या भेकड रूपात प्रकट तर होत नाहीत?

पाचशे वर्षांपूर्वीचा स्पॅनिश लेखक 'सर्व्हांटिस'चा 'डॉन क्विक्झोट' आणि कृ. ना. आठल्येंचा 'फांकडे तरवारबहाद्दर' चिरंजीव आहे! देशकालबंधनाच्या पलीकडे तो असल्याने काळाला साजेलशी नवनवीन रूपे घेतो; आणि कोणत्याही 'गॉडफादर' मागे उभा राहून '××× आगे बढो. हम तुम्हारे पीछे है!' अशा घोषणा देतो. न जाणो! आपल्यालाही कधीतरी लाल दिव्याची गाडी मिळेल असे दिवास्वप्न पाहतो. त्याला कोणताही झेंडा चालतो. तीन-तीन मजल्यांच्या उंचीच्या स्वत:च्या प्रतिमेचे वाढदिवसानिमित्त तो 'फ्लेक्सबोर्ड' लावतो. शुभ्र पोषाख, हात जोडलेले आणि चेहऱ्यावर केविलवाणे हसू!

कालचरित्राचे असेही रूप!

***

[वरील आधारग्रंथाविषयी माहिती –
'डॉन क्विक्झोट' या पाश्चिमात्य हास्यकारक कादंवरीचे संक्षिप्त रूपांतर
'फांकडे तरवारबहाद्दर!'
लेखक 'महाराष्ट्रभाषा-चित्रमयूर' कृ. ना. आठल्ये
प्रकाशक : महाराष्ट्र ग्रंथ प्रसारक मंडळ, १२, बुधवार, पुणे ता. २७-४-१९२५ किंमत १२ आणे]

संपादक
महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे ३०, फोन- ९७६७६९९३१९



अनुक्रमणिका

# बहुआयामी साहित्यिक : रणजित देसाई

(एक सिंहावलोकन)

– डॉ. सौ. ज्योती सिंदखेडकर

*[रणजित देसाई हे मराठी साहित्यातील एक सुवर्णपान आहे. अभिजात आणि प्रौढ भाषा जपणारे, इतिहासातील अंधारे कोपरे उजळून दाखविणारे कलात्मक ऐतिहासिक कथा-कादंबरीकार आणि जीवनमूल्यांची प्रतिष्ठा सांभाळणारे साहित्यिक म्हणून त्यांची ओळख मराठी साहित्याला आहे. त्यांच्या वाङ्मयाचे हे सिंहावलोकन! –संपादक]*

रणजित देसाईंची वाङ्मयीन कारकीर्द कथालेखनाने सुरू झालेली आहे. य. गो. जोशी संपादित 'प्रसाद' मासिकात प्रसिद्ध झालेल्या देसाईंच्या पहिल्या कथेला प्रथम क्रमांकाचे पारितोषिक मिळाले होते. ही घटना आहे १९४७ मधील. साधारणत: १९५० पासून ते १९९० पर्यंत रणजित देसाईंनी सातत्यपूर्ण कथालेखन केलेले आढळते. १९४५ नंतर मराठी नवकथेचा जन्म झाला. गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले, पु. भा. भावे व व्यंकटेश माडगूळकर यांनी लिहिलेल्या कथांचा समावेश नवकथेत होतो. स्वत: गंगाधर गाडगीळ यांनी नवकथेबद्दलचे त्यांचे विचार त्यांच्या **'खडक आणि पाणी'** या ग्रंथात मांडले आहेत. मराठी नवकथा प्रामुख्याने मध्यमवर्गीयांची भावचित्रे रंगविते. त्यांची बेडर प्रयोगशीलता, स्तिमित करणारी अंतर्विरोधाची मांडणी, निरनिराळ्या पातळ्यांवरून अनुभव घेण्याची पद्धती, अभिव्यक्तीचे अगदी वेगळे तंत्र, अद्‌भुताचा आश्रय यामुळे त्यांच्या कथेला अगदी निराळा घाट प्राप्त झाला आहे. समर्पक शब्दरचना, चमत्कृतीपूर्ण प्रतीके, निरर्थक तपशीलातून मोठा अर्थ उभा करणे-ही नवकथेची वैशिष्ट्ये आहेत. रणजित देसाईंची कथा मात्र मराठी नवकथेपेक्षा वेगळी आहे. फडके-खांडेकर-माडखोलकर यांच्या लघुकथा तंत्राच्या जंजाळाला जास्त महत्त्व देतात. रणजित देसाईंची कथा तंत्राच्या बंधनातून मुक्त असली तरी ती संपूर्णपणे नवकथा नाही. कारण देसाईंची कथा ही प्रसंगी गायक-गायिकांची कथा असते तर कधी ती ग्रामीण बाज घेऊन साकारते. देसाईंनी पशू व पक्ष्यांना त्यांच्या कथांमध्ये पात्रं म्हणून सुद्धा साकारले आहे. मालकावर जिवापाड प्रेम करणाऱ्या वळूने चवताळून खुद्द मालकाचाच बळी घेतला; तर चित्त्याने पिंजऱ्यात बंदिस्त असताना सुद्धा त्याच्यावर प्रेम करणाऱ्या माणूसमित्राला ओळखले. देसाई यांची लघुकथा सर्वसामान्य मराठी लघुकथेपेक्षा कशी वेगळी आहे हे विशद करताना आचार्य अत्रे म्हणतात, 'रणजित देसाई यांच्या कथेला अद्‌भुतरम्य वातावरणात वावरण्याची हौस आहे. निळ्या, सुंदर स्वप्नात ती रंगून गेलेली आहे. तिचे स्वरूप महाराष्ट्रीय असण्यापेक्षा अखिल भारतीय स्वरूपाचे आहे. वास्तवापेक्षा तिला इतिहास अधिक रुचतो. संगीत व शृंगाराच्या रसात ती नखशिखांत नाहून निघाली आहे...रसिक मनाची नादिष्ट पात्रे त्यांच्या कथेत स्वप्नातल्याप्रमाणे वावरत आहेत. कलेसाठी आणि प्रेमासाठी ती आपले जीवन उद्‌ध्वस्त करून घेतात आणि त्याची मुळीच खंत मानीत नाहीत. रणजित देसाईंच्या कथांत वावरणाऱ्या स्त्रिया



रूपवान, नाजूक, कलावंत आणि त्यागी आहेत. नायकीण असो, गाणारी असो वा कुलवती असो, त्यांनी तिच्या स्त्रीमनाचा, तिच्या मृदुलतर भावनांचा आविष्कार करताना आपली लेखणी मुलायमपणे वापरली आहे. रणजित देसाईंच्या लेखणीत प्रसाद आहे, माधुर्य आहे; वाचकाला रम्य वातावरणात नेऊन वास्तवता विसरावयास लावणारी जादू आहे. आपल्या कथेची पार्श्वभूमीही ते मोठ्या कल्पकतेने, कथेतील स्वप्नमयता वाढावी, अशा तऱ्हेने वापरतात. त्यांच्या अवलोकनशक्तीचे आणि कल्पकतेचे कौतुक करावे, तेवढे थोडेच आहे.' रणजित देसाईंच्या कथांचे वर्गीकरण करताना त्या ऐतिहासिक कथा, सामाजिक कथा, ग्रामीण कथा, संगीतप्रधान कथा, निसर्ग कथा, नक्षत्र कथा, रूपक कथा अशा प्रकारे करावे लागते. त्यांच्या कथांतील वातावरण वास्तवापेक्षा अद्‌भुततेकडे झुकणारे असले, तरी पण त्यातून आकाराला येणाऱ्या व्यक्ती मात्र मानवी जगातल्या आहेत. आपल्या सुखात रमणाऱ्या आणि आपल्या दुःखात पिचणाऱ्या त्यांच्या कोमल हृदयांचे त्यांनी केलेले चित्रण जिवंत आणि चटकदार आहे. त्यांचा पहिला लघुकथासंग्रह **'रूपमहाल'** हा असून त्यात ९ कथा आहेत. यांतील ८ ग्रामीण जीवनावरील व १ ऐतिहासिक स्वरूपाची आहे. विशेष म्हणजे 'रूपमहाल' ही एकच कथा ऐतिहासिक असूनही तिचे शीर्षक लेखकाने कथासंग्रहाला दिलेले आहे. यावरून 'रूपमहाल'चे महत्त्व लक्षात येते. ग्रामीण समाजजीवन हा या कथासंग्रहाचा गाभा असून बैलांच्या शर्यती, हत्तीची साठमारी, कुस्ती, शिकार इत्यादी विषय त्यांनी हाताळले आहेत. प्रत्येक कथेत एका संघर्षाची योजना करून त्याभोवती पोषक अशा घटनांची व ग्रामीण वातावरणाची पार्श्वभूमी रणजित देसाईंनी कलात्मकरीत्या रंगविली आहे. नाट्यपूर्ण संघर्ष रंगवताना रणजित देसाईंच्या भाषेच्या सामर्थ्याची आणि सूक्ष्म अवलोकनशक्तीची प्रचीती येते. म्हणूनच या सर्व कथा वाचकांच्या मनाची पकड घेतात. भोवतालच्या रूक्ष व कृत्रिम वातावरणातून काहीशा अद्‌भुतरम्य सृष्टीत घेऊन जातात. स्वतः रणजित देसाईंना भारतीय शास्त्रीय संगीतात विलक्षण गती होती. सर्व प्रकारची गायकी त्यांच्या रसिकमनाला मोहिनी घालीत असे. त्यांच्या बहुसंख्य कथा विविध गायक व गायिकांच्या संगीतमैफिलींवर आधारलेल्या आहेत. विविध रागांची त्यांची माहिती सर्वसामान्य वाचकाला थक्क करणारी वाटते. **'मधुमती'** कथासंग्रहातील 'रसुल', 'सेवा' व 'प्यारीबाई' या कथा गायकांच्या मैफिलींवर आधारलेल्या आहेत. गायक, चित्रपट, शिल्पकार, तबलजी इत्यादी कलावंतांच्या जीवनावरील कथा या संग्रहात आहेत. या कथा संगीत आणि शृंगाराच्या रसात नखशिखान्त न्हाऊन निघालेल्या आहेत. संगीताने नादावलेली आणि शृंगारात वाहवलेली, रसिक मनाची नादिष्ट पात्रे देसाईंच्या कथेत स्वप्नातल्याप्रमाणे वावरतात. कलेसाठी आणि प्रेमासाठी ती आपले जीवन उद्‌ध्वस्त करून घेतात; आणि त्याची मुळीच खंत मानीत नाहीत. अगदी राजेशाही ऐश्वर्याच्या धुंदीत मस्त असलेल्या रसिकराज शौनक आणि दयानंदापासून ते दारिद्र्यात पिचणाऱ्या रसुलमियाँ आणि नारायणबुवांपर्यंत सर्वच पात्रे आपल्या वेडाने धुंद झालेली, त्याकरिता सर्वस्वाची राखरांगोळी करणारी आहेत. **'गंधाली'** मधील सर्व कथा ऐतिहासिक काळातील व्यक्ती व प्रसंगांवर आधारलेल्या आहेत. ऐतिहासिक व्यक्ती वा विषयाची निवड करण्यातील कौशल्य, भाषा आणि वातावरणनिर्मिती सामर्थ्य, बहुतांश कथांत करुण, वीर, शृंगार या तिन्ही रसांचा घडणारा संगम आणि लेखकाच्या हळुवार व कलासक्त मनाचे प्रत्येक कथेत दिसणारे प्रतिबिंब इत्यादी वैशिष्ट्यांमुळे **'गंधाली'** हा कथासंग्रह वाचकांना आकर्षित करून घेण्यात यशस्वी ठरला आहे. ऐतिहासिक कादंबरीच्या क्षेत्रात

प्राप्त झालेल्या यशाच्या पार्श्वभूमीवर **'गंधाली'**चे यश लक्षणीय स्वरूपाचे आहे. रणजित देसाईंचा **'कमोदिनी'** हा कथासंग्रह १९७८ मध्ये प्रसिद्ध झाला. या संग्रहाच्या सुरुवातीलाच देसाईंनी प्रथमपृष्ठावर लिहिले आहे, 'कमोदिनी काय जाणे तो परिमल भ्रमर सकळ भोगितसे.' स्वत: कमलपुष्पाला त्याच्या सुगंधाची जाणीव नसते, परंतु भ्रमर मात्र त्याचा यथेच्छ उपभोग घेतो. या कथासंग्रहात एकूण दहा कथांचा समावेश आहे. संग्रह तसा अवघ्या १४५ पृष्ठांचा. तथापि या कथांमध्ये मानवी जीवनात प्रेम ही एक महत्त्वाची भावना आहे याचे यथास्थित निरूपण आढळते. दोन व्यक्तींमध्ये काय नाते आहे त्याप्रमाणे या प्रेमाचे स्वरूप बदलते. पति-पत्नी, प्रियकर-प्रेयसी, गुरु-शिष्या अशा संबंधांतच नाही; तर कोठीवर जाऊन प्रेम करण्याच्या संबंधातसुद्धा प्रेमाचे वेगळे कंगोरे दिसतात. या संग्रहामधील बहुतेक कथा विविध घटनांमधून या भावनेचा शोध घेणाऱ्या आहेत. कथेतील पात्रांच्या प्रभावी चित्रणातून देखील मानवी भावनांचा वेध घेतला जातो. 'अखेर' या कथेमध्ये स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या उत्कट देशभक्तीचा घेतलेला मागोवा हे याचेच उदाहरण आहे. **'आलेख'** या कथासंग्रहातील कथा ग्रामीण जीवनावर आधारित आहेत. गाव वर वर जरी शांत वाटले, तरी अंतरंगात कितीतरी घडामोडी चाललेल्या असतात. गावची चावडी, पार, हिरवेगार मळे, चिरेबंदी वाडे, गरिबाची झोपडी, डोंगरमाथे, करवंदांच्या जाळ्या ही घटनांची केंद्रस्थळे झालेली दिसतात. गावातील तऱ्हेवाईक, इरसाल, बेरकी, गरिबीने गांजलेली, देवभोळी, अंधश्रद्धाळू माणसे या कथांची मुख्य पात्रे आहेत. निसर्ग आणि जनावरे यांच्याशिवाय त्यांच्या जीवनाला पूर्णत्व येतच नाही. ही माणसे त्यांच्या ईर्ष्या, त्यांचा बाणेदारपणा, यातना, मुलांवरची माया, शहरवासीयांशी त्यांचे येणारे संबंध, सर्व सच्चेपणाने जगतात, निभावतात. निसर्ग आणि जनावरांशी एकरूप झालेली ही माणसे त्यांच्या रंगरेषांसह रणजित देसाई यांनी आपल्या लेखणीतून तितक्याच सच्चेपणाने चितारलेली आहेत. **'कातळ'** या कथासंग्रहात दोन दीर्घकथांचा समावेश असून त्या ग्रामीण कथा आहेत. बदलते ग्रामीण जीवन ही प्रस्तुत कथासंग्रहाची– दोन्ही कथांची मध्यवर्ती कल्पना आहे. सुमारे १०० वर्षांपूर्वीचे खेडे, परंपरागत पद्धतीने केली जाणारी शेती, महापूर, दुष्काळ, रोगराई, इनामदार-पाटील-कुलकर्णी यांचा कोप, या चौकटीत दोन महायुद्धांनंतरही फारसा बदल झाला नाही. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर कूळ-कायदा आला. पण जमीन सुधारणा किंवा समाजहितापेक्षा सरकारी वसुलीलाच प्राधान्य मिळाले. स्वातंत्र्याबरोबर खेड्यात नवनव्या सुधारणा आल्या. रस्ते, बंधारे, कालवे, दवाखाने यांसारख्या सोयी झाल्या. पण सर्वांत महत्त्वाचा बदल जाणवू लागला तो कुटुंबव्यवस्थेत. एकत्र कुटुंबपद्धतीला तडे जाऊ लागले. वाटण्यांच्यासाठी मोठ्या प्रमाणावर भांडणे सुरू झाली. भाऊबंदकीला ऊत आला. कोर्टकचेऱ्या सुरू झाल्या. एकूण ग्रामीण जीवन गढूळ बनत गेले. या सर्व धक्कादायक बदलांची दखल **'कातळ'** या कथासंग्रहात घेतली आहे. रणजित देसाईंच्या कथालेखनप्रवासाला एक विशिष्ट वळण मिळाले ते **'मोरपंखी सावल्यां'**मुळे. निसर्गकथांचे खास वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या कथांत निसर्गाला स्वतंत्र अस्तित्व आहे. त्यांचा निसर्ग जीवनाशी एकरूप झाल्यासारखा भासत नाही. कथांतील घटनांमधून निसर्ग डोकावण्याऐवजी निसर्गाच्या आधारेच घटना घडत राहाते. एखाद्या पक्ष्याचा, प्राण्याचा किंवा कीटकाचा उल्लेख येतो; आणि ज्याच्या पार्श्वभूमीवर ही घटना घडत असते, त्या निसर्गाचा आत्मस्पर्शी साक्षात्कार होऊन जातो. लघुकथा आणि लघुनिबंध यांच्यामधील सीमारेषा पुसट ठराव्यात, अशा प्रकारचे वर्णन यांतील



अनुक्रमणिका

निसर्गचित्रणामध्ये पाहायला मिळते. कारण इतर कथासंग्रहांप्रमाणे कथानक, व्यक्तिचित्रण, प्रसंगवर्णन, वातावरणनिर्मिती इत्यादी घटकांद्वारे कथा फुलत न ज़ाता ती निसर्गाच्या माध्यमातून विकसित होताना दिसते. प्रत्येक कथेत एखादा प्राणी आपल्या सर्व वैशिष्ट्यांसह आपल्यापुढे साकार होतो. माणसांप्रमाणेच पशुपक्ष्यांच्या अंतर्मनात शिरून त्याची उकल करण्याचे देसाईंचे कौशल्य या कथासंग्रहात पणाला लागलेले आहे. **'मेघ'** या कथासंग्रहातील कथा प्रामुख्याने माणसांच्या भावभावनांचे प्रत्ययकारी दर्शन घडविणाऱ्या कथा आहेत. या कथांच्या माध्यमातून देसाईंनी ग्रामीण जीवनाचा वेध घेतलेला आहे. घराणं, इभ्रत, प्रतिष्ठा, गावकी, वैर या धाग्यांनी विणलेल्या कथा मनाच्या तळापर्यंत पोहोचतात. जिथे घराण्याची पत सांभाळण्यासाठी आपला जीव पणाला लावणारी माणसे, आप्तेष्टांच्या प्रेमापोटी सर्वस्व उधळणारी माणसे या संग्रहातील कथांमधून आपल्याला भेटतात, तिथेच स्वार्थापोटी रक्ताच्या नात्यांना काळिमा फासणारी माणसेही भेटतात. लालित्यपूर्ण शैलीतल्या या कथा वाचून आणि अनुभवून रणजित देसाई आपल्या काळातील एक थोर साहित्यिक होते, याचा आपल्याला उत्कट प्रत्यय येतो. त्यांचा **'आषाढ'** हा कथासंग्रह एकूण १८ कथांचा संग्रह आहे. निसर्ग आणि माणूस यांच्यात एक अनोखे नाते आहे. निसर्गाच्या ऋतूंप्रमाणेच माणसाचे मनही रंग बदलत असते. हीच कल्पना उचलून रणजित देसाई यांनी आपल्या सिद्धहस्त लेखणीतून अनेक कथा लिहिल्या आणि त्यांना ऋतूंची नावे दिली, जसे **'मेघ'**, **'आषाढ'**, **'वैशाख'**. ग्रामीण पार्श्वभूमीवर चितारलेल्या या कथा माणसांतल्या सर्व भावभावनांचे प्रत्ययकारी दर्शन घडवितात. निसर्गाच्या ऋतुचक्राचे माणसांच्या दैनंदिन जीवनावर आणि मनावरही जे पडसाद उमटतात ते या कथांमध्ये देसाईंनी आपल्या लेखणीतून अचूक पकडले आहेत. त्यांच्या **'वैशाख'** या कथासंग्रहात एकूण १८ कथांचा समावेश असून, या कथा त्यांनी सुरुवातीला लिहिलेल्या आहेत. ग्रामीण जीवनाचा वेध घेणाऱ्या या कथांमध्ये माणसातला कोरडेपणा वैशाखाच्या उन्हाप्रमाणेच मनाला चटका देऊन जातो. **'मेखमोगरी'**, **'प्रपात'**, **'संकेत'** व **'बाबुलमोरा'** या संग्रहांतील कथांचे वर्गीकरण सामान्यत: सामाजिक कथा, ग्रामीण कथा, संगीतप्रधान कथा व निसर्ग कथा असे केलेले आहे. **'प्रपात'** व **'संकेत'** यांतील कथा या ग्रामीण कथा आहेत. ग्रामीण भागातील बदललेल्या समाजजीवनाचे चित्रण त्या कथांमध्ये येते. **'बाबुलमोरा'** या संग्रहातील कथा ऐतिहासिक व सरंजामशाही वातावरणातील आहेत. या कथांची भाषाशैली खानदानी, डौलदार व ललितरम्य आहे. रोमॅन्टिक प्रतिमासृष्टी, आखीवरेखीव, नाट्यपूर्ण कथानक हे या कथांचे खास वैशिष्ट्य. या संग्रहात एकूण सोळा कथा असून, त्यातील सहा ऐतिहासिक व दहा संगीतप्रधान आहेत. कलावंताचे खासगी जीवन, लहरी वृत्ती, व्यसनाधीनता, उदारता, कलेवरील निष्ठा, दारिद्र्य, कर्जबाजारीपणा, मानसिक अस्वास्थ्य, कलंदर वृत्ती इत्यादी पैलूंचे दर्शन देसाईंनी वेगवेगळ्या कथांतून घडवले आहे. तर ऐतिहासिक कथांपैकी बहुतेक कथांतून शृंगार आणि वीररसाची प्रचीती येते. 'वेडात दौडले सात' या कथेत राज्यासाठी हौतात्म्य पत्करणारा पराक्रमी प्रतापराव आणि त्याच्यावरील निस्सीम प्रेमापोटी प्राणार्पण करणारी निर्मला या दोघांच्या त्यागमय भावजीवनाची नितांतसुंदर कहाणी सांगितली आहे. देसाईंच्या कथेचे लक्ष्य माणसातल्या मूल्यांवर स्थिरावले आहे. सत्य, न्याय, परोपकार, निष्ठा, त्याग, दया, भक्ती इत्यादी मूल्यांच्या जोपासनेमुळे होणारा परिणाम त्यांच्या कथेत सूचित होताना दिसतो. मग ती व्यक्ती ऐतिहासिक काळातील



अनुक्रमणिका

असो, संगीतक्षेत्रातील असो, ग्रामीण भागातील असो किंवा एखाद्या शहरातील असो. अशा प्रकारे रणजित देसाईंनी त्यांच्या कथांमध्ये ग्रामीण जीवन, ऐतिहासिक वास्तू व व्यक्ती, निसर्गातील पशू-पक्षी-अरण्ये आदी, खानदानी-सरंजामशाहीची स्मृती जागविणारे वाडे-वस्त्या, हिंदुस्थानी संगीताचे दर्दी गायक-गायिका व रसिक-श्रोतृवृंद चितारलेले आहेत व त्यामुळे त्यांच्या सर्वच कथा वाचनीय झालेल्या असून त्यांना प्रचंड वाचकवर्ग लाभलेला आहे.

रणजित देसाईंची चार ऐतिहासिक नाटके प्रसिद्ध अशा ऐतिहासिक महापुरुषांच्या कार्यकर्तृत्वावर आधारित आहेत. 'संगीत तानसेन' हे संगीतसम्राट तानसेन या मुगल बादशाह अकबराच्या दरबारातील नवरत्नांपैकी एका अशा रत्नावर आधारित आहे. पंडित हरिदासांचा शिष्य असलेल्या तानसेनला स्वर्गीय आवाजाची दुर्मीळ देणगी प्राप्त झाली होती. प्रस्तुत नाटकात असलेला संघर्ष हा पितापुत्रातील-तानसेन व बिलासखान यांच्यातील आहे. बिलासखानने एका सामान्य कोठीवरच्या गायिकेला जवळ केल्यामुळे त्याच्यात व तानसेनमध्ये दुरावा निर्माण होतो व त्या घटनेनेच तानसेनचा अकाली मृत्यू होतो. त्याच्या पार्थिवाशेजारी बिलासखानने जो राग गायिला तो पुढे 'बिलासखानी तोडी' नावाने प्रसिद्ध झाला. रणजित देसाईंच्या या पहिल्या नाटकात संघर्ष उत्तम वठविलेला असला तरी हे नाटक पहिल्याच प्रयोगात कोसळले असल्याची नोंद आहे. **'स्वामी'** व **'श्रीमानयोगी'** या दोन्ही अत्यंत गाजलेल्या कादंबऱ्यांवर आधरित त्याच शीर्षकांची नाटके स्वत: रणजित देसाईंनीच लिहिली. ही दोन्ही नाटके व्यावसायिक रंगभूमीवर अत्यंत यशस्वी ठरली. **'स्वामी'** हे नाटक मोहन वाघांच्या चंद्रलेखा या नाट्यसंस्थेने सादर केले व नाटकाचे हजारो प्रयोग महाराष्ट्रभर झाले. याचा शंभरावा प्रयोग प्रत्यक्ष पेशव्यांच्या शनिवारवाड्यात सादर करण्यात आला होता. या नाटकातला संघर्ष हा दुहेरी स्वरूपाचा आहे. पहिला संघर्ष माधवराव पेशवे व मराठी दौलतीचे बाह्यशत्रू– निजाम, टिपू सुलतान, प्रत्यक्ष मोगल– यांच्यातला आहे. दुसरा संघर्ष मात्र अतिशय नाजूक असून तो पेशव्यांच्या घरातलाच आहे. माधवरावांचे काका राघोबादादा यांनी सतत पेशव्यांच्या विरोधात कारवाया केल्या. शक्य तितक्या प्रकारचा त्रास राघोबांनी माधवरावांना दिला. या दुहेरी संघर्षात माधवरावांसारख्या उमद्या व्यक्तिमत्त्वाच्या तरुणाचा बळी गेला. हे नाटक केवळ अंतर्गत व बाह्य संघर्षांमुळे गाजले, यशस्वी झाले, हे जरी खरे असले, तरी या नाटकाचे यश रमा-माधव यांच्या अजरामर प्रेमाच्या शोकांतिकेत सामावले आहे. माधवरावांच्या अकाली मृत्यूने रमाबाईंचाही अकाली अंत घडवून आणला. त्या माधवरावांच्या चितेवर सती गेल्या. **'श्रीमानयोगी'** हे नाटक मराठी साम्राज्याची स्थापना करणाऱ्या व ते वाढविणाऱ्या छत्रपती शिवरायांच्या कार्यकर्तृत्वावर व आयुष्यावर आधारलेले आहे. छत्रपतींच्या आयुष्यातील प्रत्येक प्रसंग हा रोमहर्षक असून, त्या-त्या प्रसंगावर स्वतंत्र नाटक किंवा कादंबरी लिहिली जाऊ शकेल अशा योग्यतेचा आहे. **'रामशास्त्री'** हे आणखी एक देसाईंचे यशस्वी ऐतिहासिक नाटक. या नाटकातील संघर्ष तर सर्वश्रुत आहे. नि:स्पृह रामशास्त्री कर्तव्यकठोरपणाने राघोबादादांना भर दरबारात नारायणराव पेशव्यांचे खुनी ठरवून देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा ठोठावतात. जेव्हा राघोबा पुराव्याची मागणी करतात तेव्हा रामशास्त्री प्रत्यक्ष रघुनाथरावांच्या सही-शिक्क्यानिशी जारी करण्यात आलेले फर्मानच दरबारात हजर करतात. ते जाहीरपणे फर्मान वाचून दाखवितात. रामशास्त्रींचे पात्र प्रेक्षकांच्या मनात थरार निर्माण

करणारे असून कायमचा ठसा उमटविणारे आहे. रणजित देसाईंच्या ह्या चारही ऐतिहासिक नाटकातील पात्र व प्रसंगांची गुंफण अतिशय कलात्मक असून प्रेक्षकांचे लक्ष वेधून घेणारी आहे. या नाटकांतील संवाद मार्मिक असून; ते ऐतिहासिक नाटकांत शोभून दिसणारे आहेत. संवादांची भाषा जोमदार असून त्या-त्या पात्रांच्या तोंडी ती चपखल बसते. ऐतिहासिक पात्रांचा बाज या संवादांनी अतिशय उत्तमपणे पेलून धरला आहे. रणजित देसाईंची उर्वरित दहा नाटके सामाजिक आशयांची आहेत. देसाईंचे मन इतिहासात व अद्‌भुतात जास्त रमते, हे जरी खरे असले, तरी त्यांनी सभोवतालच्या समाजात घडणाऱ्या घटनांना देखील त्यांच्या साहित्यात योग्य स्थान दिले आहे. सध्याच्या समाजात मूल्यांचा होणारा ऱ्हास हा त्यांच्या चिंतनाचा खास विषय. अर्थार्जनासाठी व केवळ मौजेसाठी वाटेल तो मार्ग स्वीकारणारी तरुण पिढी त्यांनी **'लोकनायक'** व **'पंख जाहले वैरी'** या नाटकात चितारली आहे. **'लोकनायक'** या नाटकातील स्वातंत्र्ययुद्धात प्रत्यक्ष भाग घेतलेल्या व्यक्तीला स्वतंत्र भारतातील मतदार कसे नाकारतात याचे यथार्थ चित्रण आले आहे. पण स्वातंत्र्यलढ्यातील पिढी ही महात्मा गांधीजींच्या तत्त्वज्ञानावर नितांत श्रद्धा असणारी व आयुष्यभर सकारात्मक कार्याला वाहून घेणारी पिढी होती व त्यामुळे या काळातील माणसे केवळ सत्ता गेली म्हणून निराश होणारी नव्हती. सत्तेविनासुद्धा समाजसेवा करता येते, अशा विचारांची ती पिढी होती, हा या नाटकाचा आशय. सत्तरीच्या दशकात पुण्यासारख्या संस्कृतीच्या व विद्येच्या माहेरघरी अत्यंत क्रूरपणे माणसांना मारणारे **सुतार व जक्कल** सारखे तरुण निपजले. त्यांच्या लाजिरवाण्या, क्रूर कृत्यांवर आधारलेले नाटक म्हणजे **'पंख जाहले वैरी'** हे होय. या नाटकात दुर्दैवाने अकाली विधवा झालेल्या सुलभा या शिक्षिकेच्या मुलांची कहाणी येते. दोन्ही मुलांना नवऱ्याच्या पश्चात्‌ मोठ्या कष्टाने ती वाढविते, शिकविते. त्यांना चांगल्या संस्कारांची शिदोरी देते. पण या सर्व गोष्टी कमी पडतात की काय अशी परिस्थिती नव्या पिढीत निर्माण झाली आहे. सुलभाची दोन्ही मुले गुन्हेगार होतात. क्षुद्र स्वार्थासाठी ती कोणतेही दुष्कृत्य करायला तयार होतात. थोरला मुलगा वाईट मित्रांच्या साहाय्याने नायलॉनची दोरी वापरून कुणाचाही गळा आवळतो व खून करतो आणि अशांचे पैसे लुबाडतो. लहान मुलगा विद्यापीठ परीक्षांचे पेपर फोडतो, प्रत्यक्ष प्राचार्यांच्या मुलीला फसवतो व ही पापे निष्पाप आईपासून लपवून ठेवतो. सुलभा हताश होऊन उच्चारते, 'माझेच पंख जाहले माझेच वैरी!' रणजित देसाईंच्या सामाजिक नाटकांतील अत्यंत यशस्वी नाटक म्हणजे, **'हे बंध रेशमाचे'** हे होय. मोहन वाघांच्या 'चंद्रलेखे'ने या नाटकाचे हजारोवर प्रयोग व्यावसायिक रंगभूमीवर सादर केले. या नाटकातील सुश्राव्य गीते शांता शेळके यांची असून, त्यांना सूरबद्ध केले होते पंडित जितेंद्र अभिषेकी यांनी. प्रा. मधुकर तोरडमल यांचे समर्थ दिग्दर्शन नाटकाला लाभले असून, त्यात सुरुवातीच्या प्रयोगांमध्ये श्रीकांतची भूमिका वसंत देशपांडे यांनी केली होती. देशाच्या फाळणीवर आधारलेले हे नाटक त्या कालावधीत खूपच गाजले. देशाच्या फाळणीची पार्श्वभूमी, उत्तम संवाद, मधुर गीते व सुयोग्य दिग्दर्शन आदी घटकांमुळे या नाटकाने एकेकाळी मराठी प्रेक्षकांना वेड लावले होते. उर्वरित दहा नाटके सामाजिक आशयाची असली तरी त्यांतील दोन-तीन नाटकांमध्ये इतिहासकालीन वाड्यांची, सरदारांची, संस्थानिकांची संस्कृती आलेलीच आहे. **'तुझी वाट वेगळी'** हे नाटक देसाईंचे शेवटचे नाटक असून, ते सावनगडचे





अनुक्रमणिका

शेवटचे महाराज सुरजितसिंह व गायिका चंदा यांच्या भावमधुर प्रेमकथेवर आधारित आहे. संस्थानिकांच्या प्रथेप्रमाणे सुरजितसिंह व एक सामान्य गायिका चंदा यांचा विवाह होत नाही. दोघांच्याही वाटा वेगळ्या होतात. परंतु त्यांच्या त्यांच्या वाटेवर देखील त्यांचे प्रेम कमी होत नाही, हाच या नाटकाचा आशय! रणजित देसाईंना हिंदुस्थानी अभिजात संगीताची उत्तम जाण होती व या गुणाचा त्यांनी त्यांच्या नाटकांमध्ये योग्य तो उपयोग केलेला आहे. सर्वच राग-रागिण्यांची त्यांना उत्तम समज असल्याकारणाने त्यांच्या नाटकांना आपोआपच अभिजात संगीताची पार्श्वभूमी लाभत गेली.

रणजित देसाई हे एक बहुआयामी साहित्यिक होते. त्यांच्या रूपाने मराठी वाङ्मयाला एक प्रकारचे श्रेष्ठतम मूल्य प्राप्त झाले आहे. त्यांच्या कादंबऱ्या, त्यांच्या कथा व त्यांची नाटके यांनी मराठी वाङ्मयाला खऱ्या अर्थाने समृद्ध केले. रणजित देसाईंच्या सर्वच नाटकांमध्ये अत्यंत महत्त्वाचे घटक म्हणजे उत्कृष्ट पात्रचित्रण, आकर्षक प्रसंगांची कलात्मक मांडणी, खटकेबाज संवाद, सुयोग्य पदरचना व सादरीकरणातली मार्मिकता हे होत. त्यांच्या एकूण सर्वच वाङ्मयाला - कादंबऱ्या, कथा, नाटके यांना चिरंतन मूल्य प्राप्त झालेले आहे.

रणजित देसाईंनी त्यांच्या **'स्नेहधारा'** या स्मृतिचित्रात काही ज्येष्ठ साहित्यिक, प्रसिद्ध गायक व रंगभूमीवरील कलावंत आणि काही ज्येष्ठ-श्रेष्ठ नेते यांच्या आठवणी शब्दबद्ध केल्या आहेत. मराठी वाङ्मयात आत्मचरित्रात्मक लिखाणात मोठमोठ्या साहित्यिकांनी आपल्या प्रिय स्वकीयांची स्मरणचित्रे आत्मीयतेने रेखाटलेली आहेत. लक्ष्मीबाई टिळकांची **'स्मृतिचित्रे'**, आनंदीबाई जावडेकरांचे आत्मचरित्र **'हे मीच सांगितले पाहिजे'**, स्नेहलता प्रधानांचे **'स्नेहांकिता'**, आचार्य अत्रे यांचे **'कऱ्हेचे पाणी'** आदी आत्मचरित्रात्मक लिखाणात फार सुरेख अशी स्मरणचित्रे आपल्याला आढळतात. रणजित देसाईंचे **'स्नेहधारा'** हे काही त्यांचे आत्मचरित्र नव्हे. परंतु त्यांना जीवनात भेटलेल्या व भावलेल्या ज्येष्ठ-श्रेष्ठ व्यक्तींबद्दलच्या भावना त्यांनी या स्नेहचित्रांमध्ये व्यक्तविल्या आहेत. वि. स. तथा भाऊसाहेब खांडेकर, आचार्य अत्रे, स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्यासारख्या ख्यातकीर्त लेखकांबद्दल देसाईंना जे अनुभव आले ते त्यांनी येथे व्यक्तविले आहेत. सुप्रसिद्ध गायक वसंतराव देशपांडे, रंगभूमीवरील नट डॉ. काशिनाथ घाणेकर व शरद तळवलकर हे देसाईंचे खास मित्र. या मित्रांबद्दलच्या आठवणी देसाई येथे मनःपूर्वक रंगवितात. स्वर्गीय यशवंतरावजी चव्हाण, बाळासाहेब देसाई, पुंडलिकजी कातगडे यांच्याविषयीचा जिव्हाळा व त्यांनी देसाईंना दिलेले प्रेम यांचा या **'स्नेहधारे'**मध्ये ते कृतज्ञतेने उल्लेख करतात. **'स्नेहधारा'** यातील ललितगद्य प्रासादिक असून लालित्यपूर्ण आहे. रणजित देसाईंना येथे ज्यांच्या आठवणी त्यांनी रंगविल्या आहेत, त्यांच्याप्रती असणारा आदर, स्नेह व प्रीती त्यांनी दिलखुलासपणे येथे व्यक्तविली आहे. देसाईंच्या मनाचा प्रांजळपणा ही या स्मृतिचित्रांची जमेची बाजू. यातील स्मृतिचित्रे म्हणजे काही देसाईंचे आत्मनिवेदन नाही. यातील बहुसंख्य स्मृती विरळ व अंधुक आहेत. पण त्या व्यक्तविण्यातील तळमळ व मनाची पारदर्शकता स्तुत्य आहे. रणजित देसाई हे मराठी वाङ्मयाला लाभलेले बहुआयामी व्यक्तिमत्त्व. त्यांच्या कथा, कादंबऱ्या व नाटकांनी मराठी वाङ्मयाला एक नवे परिमाण उपलब्ध करून दिले. त्यांच्या लिखाणातील प्रासादिक गुणांमुळे व त्यांच्या सामाजिक बांधिलकीमुळे ते त्यांच्या समकालीन लेखकांत



अनुक्रमणिका

वेगळे उठून दिसतात. विविध ठिकाणच्या साहित्य संमेलनात देसाईंनीं अध्यक्षपदावरून वेळोवेळी साहित्यविषयक मूलगामी चिंतन व्यक्त केले आहे. साहित्य हे समाजाभिमुख असायला पाहिजे व लेखकांनी वाङ्मयनिर्मिती करताना ते समाजाचे भाष्य म्हणून निर्माण केले पाहिजे या मताचे देसाई पुरस्कर्ते होते. एकोणिसाव्या शतकातील सुप्रसिद्ध आंग्ल कवी, समीक्षक व गद्य लेखक मॅथ्यू अर्नॉल्ड यांनी वाङ्मयाची व्याख्या करताना असे म्हटले आहे, 'Poetry is the criticism of life.' 'वाङ्मय म्हणजे जीवनाचे भाष्य होय.' वि. स. खांडेकर यांना गुरुस्थानी मानणाऱ्या रणजित देसाईंनी ज़ीवनवादी साहित्यच निर्माण केले. त्यांच्या सर्व व्याख्यानांमध्ये त्यांनी अभिजात साहित्याच्या प्रेरणा, साहित्याचे प्रयोजन व साहित्याचा स्वभाव यांविषयीच विचार मांडले. एकदा जीवनवादी साहित्यिक म्हणून स्वीकारलेली भूमिका त्यांनी त्यांच्या सर्व वाङ्मयातून प्रामाणिकपणे निभावून नेली.

त्यांच्या समकालीन साहित्यिकांमध्ये रणजित देसाईंचे स्थान वेगळे असून श्रेष्ठ असे आहे. जेव्हा देसाईंनी कथा, कादंबऱ्या, नाटके लिहिली त्याच वेळी श्री. ज. जोशी, गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर, अरविंद गोखले, जयवंत दळवी, चि. त्र्यं. खानोलकर आदी साहित्यिक कथा, कादंबऱ्या, नाटके लिहीत होते. गाडगीळ, गोखले, माडगूळकर यांना नवकथाकार म्हणून संबोधिले जाते. त्यांच्या समकालीन कथा लिहिणारे रणजित देसाई मात्र नवकथेसारखी कथा लिहीत नव्हते. देसाईंच्या कथा ह्या पारंपरिक व नवकथेच्या बरोबर मध्यभागी उभ्या राहाणाऱ्या कथा आहेत. जयवंत दळवी, चि. त्र्यं. खानोलकर, रणजित देसाई यांनी कथा, कादंबऱ्या व नाटके विपुल प्रमाणात लिहिली. असे असूनसुद्धा देसाईंच्या कथा या दुर्बोध नसून अतिशय सुंदर व तंत्राच्या जंजाळात अडकून पडलेल्या नाहीत. त्यांच्या कादंबऱ्या सामाजिक, ऐतिहासिक व पौराणिक स्वरूपाच्या असून, वाचकांच्या अंत:करणाला जाऊन भिडणाऱ्या आहेत. त्यांच्या नाट्यकृती या सादरीकरणाच्या दृष्टीने अतिशय सोयीस्कर आहेत. त्यांतील पात्रे व प्रसंग यांची मांडणी कलात्मक असून ती प्रेक्षकांना खिळवून ठेवणारी आहे. त्यांनी रेखाटलेली स्मरणचित्रे धूसर नसून त्या-त्या स्मरणचित्रातून संबंधित कलाकार, गायक, राजकारणी, मुत्सद्दी यांच्या नेमक्या गुणांचे आपल्याला दर्शन घडते. मोजकेच प्रसंग चितारून त्यांनी संबंधित व्यक्तींना न्याय दिलेला दिसून येतो. त्यांचे अभिजात साहित्य, साहित्याच्या प्रेरणा व साहित्याची भाषा याबद्दलचे विचार सुस्पष्ट असून ते त्यांनी समर्पक शब्दांनी आपल्या लक्षात आणून दिले आहेत. त्यांचा समग्र साहित्यसंभार लक्षात घेऊन भारत सरकारने त्यांना **पद्मश्री** पदवी प्रदान केली होती.

मराठी वाङ्मयाच्या प्रांतात रणजित देसाई यांचे स्थान निश्चितच अढळ आहे. त्यांच्या कादंबऱ्या, कथा व नाटके त्यांनी वास्तवाच्या वळणावर आणून ठेवली आहेत. स्वप्नरंजन, अवास्तव वर्णन किंवा केवळ 'रोमान्स' आदी त्यांच्या समकालीन कथा-कादंबऱ्या-नाटके इत्यादी साहित्य प्रकार हाताळणाऱ्या लेखकांपेक्षा रणजित देसाईंनी लिहिलेल्या कथा-कादंबऱ्या-नाटके यांत नेटकेपणा, प्रखर वास्तव व नाट्यमयता आदी मूल्ये प्रखरपणे जाणवतात व हेच त्यांचे मराठी वाङ्मयाच्या प्रांतातील श्रेष्ठ स्थान आहे, असे म्हणावेसे वाटते.

◇◇◇

**डॉ. सौ. ज्योती सुशील सिंदखेडकर**
४६ बागेश्री, कमलाताई हौ. सोसायटी.
मोहिदे (त.ह.) ता. शहादा,
जि. नंदुरबार (महाराष्ट्र राज्य)



अनुक्रमणिका

# एक सौंदर्यवादी काव्यप्रवास : कवि मंगेश पाडगावकर

– शीला निपुणगे

*[सौंदर्यवादी कवितेला स्वच्छंदवादी असेही म्हटले गेले. जीवनात प्रेम, सौंदर्य, निसर्ग, निरागसवृत्ती आणि जीवनातील सौंदर्याचा नाश करणाऱ्यांपासून दूर-दूर कुठेतरी लांब स्वप्ननगरीत जाऊ. नाहीतर कलंदर होऊन भटकत राहू. ह्या वृत्तीतून जन्माला येणारी कविता स्फुरते कशी? तिचे स्वयंसिद्ध नृत्यगानानुकूल रचनाबंध कसे प्रकट होतात. तरल भावनुभव ती कशी शब्दबद्ध करते. यांचेही ते भाष्यकार होतात. शब्दांमधून ऐंद्रिय संवेदनांचे साक्षात्कार कसे होतात. निसर्ग आणि प्रेम यांचे अतूट गूढ नाते काव्यबद्ध करणे, बालगीते, वात्रटी, विडंबन, नाद-लयीतून प्रकटणारे गाणे. अशा सौंदर्यवादी वृत्तीचा प्रभाव असलेल्या कवितेत मंगेश पाडगावकरांची नाममुद्रा अविस्मरणीय आहे. १९५० नंतर कवितेला रसिकांपर्यंत पोहोचविण्यासाठी त्यांनी काव्यगायनाचे/कविता अभिवाचनाचे प्रयोग महाराष्ट्र आणि महाराष्ट्राबाहेर केले. त्यांच्या ६१ वर्षांच्या काव्यप्रवासाची ही परिक्रमा!*

*–संपादक]*

*'स्वर्ग नको, सुरलोक नको*
*मज लोभस हा इहलोक हवा'*

असे प्रसिद्ध सौंदर्यवादी कवी बा. भ. बोरकर यांनी म्हणून ठेवले आहे. याच परंपरेतील जीवनावर भरभरून प्रेम करणारे सौंदर्यवादी कवी आहेत मंगेश पाडगावकर. गोमंतकातील- त्यातही 'बोरी' या निसर्गसुंदर गावातील सृष्टिसौंदर्याचे संस्कार बोरकरांच्या मनावर झाले, तसेच कोकणातील 'वेंगुर्ले' या गावातील नितान्तसुंदर निसर्गाने बालपणापासूनच पाडगावकरांना भुरळ घातली. त्यांची कविता प्रथम जन्मली ती याच ठिकाणी.



मंगेश पाडगावकरांनी, शाळकरी वयात आपली कविता बोरकरांची कविता ऐकून, त्याप्रमाणेच बेतली होती, असे स्वतःच म्हटले आहे. तरीही बोरकरांची कविता ज्याप्रमाणे स्वतंत्रपणे बहरली, तशीच पाडगावकरांच्या कवितेनेही स्वतंत्रपणे निर्मितीची असंख्य रूपे घेतली.

निसर्गकवितेपासून प्रेमकविता, सामाजिक-राजकीय जाणिवेच्या कविता, गूढगुंजनात्मक तसेच पारलौकिकाचा वेध घेऊ पाहणाऱ्या रचना आणि काव्यनिर्मितीविषयक वैशिष्ट्यपूर्ण कविता, अशी सर्वस्पर्शी कविता, पाडगावकर, गेली जवळजवळ पासष्ट वर्षे लिहीत आहेत.

'माझ्या कवितेला कोणताही विषय वर्ज्य नाही' असे म्हणणाऱ्या या कवीने सुख-दुःख, आनंद-वेदना, प्रीती-विरह, सौंदर्य-विरुपता, विसंगती-विकृती, एकाकीपण, विवशता अशा जीवनातील सर्व विकार-विचारांना स्पर्श केला आहे.

असे सांगताना पाडगावकर कुसुमाग्रजांच्या कवितेचे ऋणही मनोमन स्मरतात. 'कुसुमाग्रजांच्या कवितेतून पोषण घेऊन माझी कविता वाढली'



अनुक्रमणिका

असे त्यांनी कृतज्ञतेने म्हटले आहे.

१९५० साली पाडगावकरांचा 'धारानृत्य' हा पहिला काव्यसंग्रह 'मौज' प्रकाशनाने प्रसिद्ध केला. त्यानंतर जिप्सी, छोरी, उत्सव, सलाम, भटके पक्षी, तुझे गीत गाण्यासाठी, नवा दिवस, त्रिवेणी, राधा, गिरकी, गझल, कविता- माणसांच्या माणसांसाठी, आनंदऋतू, सूर आनंदघन, मुखवटे अशा वैविध्यपूर्ण काव्यसंग्रहातून या कवीच्या प्रतिभेचे नवनवीन उन्मेष उमलत राहिले.

भोलानाथ, बबलगम, चांदोमामा, वेडं कोकरु, झुले बाई झुला अशा दहा-अकरा बालगीतसंग्रहांमधून त्यांनी मुलांना कवितेतून मिळणाऱ्या आनंदाची ओळख करून दिली; तर सलाम, विदूषक, उदासबोध क्षणिका, वात्रटिका अशा संग्रहातील राजकीय-सामाजिक जाणिवेच्या कवितांमधून वर्तमानकालीन वास्तवातील विकृती-विसंगतींवर कोरडे ओढले.

शेक्सपिअरच्या तीन नाटकांचा अनुवाद, तसेच मीरा, कबीर, सूरदास यांच्या रचनांचा समवृत्त भावानुवाद, 'बायबल : नवा करार' हा महत्त्वपूर्ण अनुवाद त्यांनी केला. तोही त्या-त्या कवीच्या, विषयाच्या प्रगाढ व्यासंगातूनच. यापैकी कित्येक पुस्तकांना त्यांनी ज्या प्रस्तावना लिहिल्या, त्यातूनही पाडगावकरांचा कविता-काव्य आणि एकंदर साहित्यव्यापाराकडे पाहण्याचा दृष्टिकोन, त्याविषयीचे त्यांचे सखोल चिंतन आणि त्यांची उदंड सर्जक शक्ती यांचे सुरेख प्रत्यंतर येते.

या अनुवादित पुस्तकांच्या प्रस्तावनांचे संकलन नुकतेच 'चिंतन' या ताज्या संग्रहातून प्रसिद्ध झाले आहे.

यापूर्वी म्हणजे २०१० मध्ये 'पाडगावकरांचा 'शोध कवितेचा' हा महत्त्वपूर्ण लेखसंग्रह प्रसिद्ध झाला. महत्त्वपूर्ण अशासाठी की- आपली कविता, तिची निर्मितीप्रक्रिया, तिचा आस्वाद यांच्याविषयी प्रकट चिंतन करतानाच यातील लेखांमधून पाडगावकरांनी एकंदरीत साहित्यनिर्मिती, साहित्यव्यवहार आणि त्याला अपरिहार्यतेने वेढून असलेले मानवी मनोव्यापार यांविषयी अत्यंत मनोज्ञ असे विचारमंथन केले आहे.

'The true poem is the Poet's mind' ही पाश्चात्त्य कवी इमर्सन यांची उक्ती याबाबत सार्थ ठरावी.

पाडगावकरांच्या कवितेच्या निर्मितीमागच्या या प्रेरणांचा वेध घेणे हाच या लेखाचा विषय आहे.

'कविता कशी सुचते' हे किंवा तिच्या निर्मितीमागचे गूढ शोधताना पाडगावकरांनी म्हटले आहे-

'पुष्कळ वेळा एखादी कविता लिहून झाल्यानंतर ती कशी सुचली, याचे मला कोडे पडते... निर्मितीच्या प्रक्रियेचे गूढ स्वरूप अजून मला आकळलेले नाही...'

निर्मितीचा प्रत्यक्ष क्षण त्यांना असा धूसरतेत, गूढतेत बुडालेला वाटतो आणि मग प्रत्यक्ष घडणारे सृजन हे 'भूमीचा थर भेदून येणाऱ्या हिरव्या पात्याप्रमाणे लोभावून टाकणारे असते! या बाबतीत 'निर्मिती' या कवितेत पाडगावकर म्हणतात-

*'त्या क्षणि या आकृतिचे बंधन*
*मलाच माझे नकळत गळलें*
*विदेहीच त्या क्षणी परंतू*
*आकाराचे रहस्य कळलें*
*रहस्य कळलें अंधाराला*
*कळलें नक्षत्रांशीं नातें*
*अन मी भेदुनि भूमीचा थर*
*रुजलो होउनि हिरवे पातें!'*

निर्मितीच्या त्या क्षणाची कविमनाला जाणवलेली गूढता... 'माझ्या नकळत मनात खोल कुठेतरी रुजलेला अनुभूतीचा क्षण, मातीचे कवच भेदून वर येणाऱ्या हिरव्यागार पात्याप्रमाणे केव्हा आणि कसा प्रकट होतो, याचे रहस्य मला अजूनही उकललेले नाही,'

अशा शब्दात, पाडगावकर ती व्यक्त करतात. निर्मितीची ही प्रक्रिया त्यांना मातीतून उगवून येणाऱ्या हिरव्या अंकुराइतकीच सहज-स्वाभाविक, अपरिहार्य, तितकीच अनाकलनीयही वाटते. गवताचे हे 'हिरवे पाते' मग त्यांच्या कवितेला आणि मनालाही कायमच ताजा, टवटवीत आनंद देत जाते.

'निसर्ग ही माझ्या कवितेची पहिली प्रेरणा आहे', असे पाडगावकर म्हणतात, तेव्हा त्यांना प्रथमत: अभिप्रेत असतो तो वेंगुर्ल्याचा रम्य असा निसर्ग.

*'वेंगुर्ल्याचा पाऊस कसा*
*माया करीत यायचा*
*सरींनी लाड करीत*
*मला कुशीत घ्यायचा!'*

असे बोलगाणे ते आजही अगदी आतून लिहितात. वेंगुर्ल्याच्या घरासारखे जीव लावणारे घर, तिथला ओढ लावणारा निसर्ग शहरात आल्यानंतर दुरावला, याची खंत कित्येकदा त्यांच्या कवितेतून आर्ततेने व्यक्त झालेली दिसते.

वेंगुर्ल्याचा पाऊसच नव्हे, तर तिथले घर, अंगण, भोवतीची वाडी, उंच माड, निळेभोर आकाश, आपल्याच तंद्रीत पळणाऱ्या लाल वाटा आणि समुद्राच्या झपाटलेल्या लाटा, त्याची अनंत रूपे आणि त्याची धीरगंभीर गाज या सर्वांशी बालवयातच पाडगावकरांचे अतूट असे नाते जुळले. या निसर्गानेच त्यांच्या अनुभवात रंग भरले, भावनांना ताल दिला आणि त्यांच्या काव्याला त्याने रूपसुंदर प्रतिमांनी सजविले, असे त्यांनी म्हटले आहे.

वेंगुर्ल्याच्या याच घरात आपल्या आईकडून आणि आजोबांकडूनही कवितेचा, गाण्याचा वारसा त्यांना मिळाला. आई त्यांना चांगल्या कविता वाचून दाखवीत असे. त्यांच्याकडून म्हणवूनही घेत असे. या श्रवण-पाठांतरातून, गणमात्रांच्या अभ्यासाशिवायही छंदोबद्ध रचना करण्याचा वस्तुपाठ त्यांना मिळाल्याचे ते नोंदवितात.

वयाच्या नवव्या-दहाव्या वर्षापासून मंगेश कविता करू लागला. सुचलेला एखादा विषय, अनुभव किंवा भावना शब्दात बांधणे अशा स्वरूपाच्या या रचनांमध्ये काव्यापेक्षा उत्साह अधिक असणे स्वाभाविक होते; पण या कविता कवीच्या स्वत:च्या अनुभूतीतून आलेल्या नव्हत्या, याची जाणीव जेव्हा झाली, तेव्हा त्यांना आपली स्वत:ची कविता सापडत गेली. कविता ही केवळ यमके जुळवून साचेबंद पद्धतीने 'करायची' नसते, ही प्रचिती येत गेली, तेव्हा केवळ आकारसौंदर्यात किंवा रचनासौष्ठवात बंदिस्त झालेल्या त्या काळातील त्यांच्या कवितेने पुढे अनेक स्थित्यंतरे अनुभवली.

सुरुवातीच्या कवितेचे स्थूल स्वरूप, शब्दांचा, रुपकांचा हव्यास तसेच एकाच प्रधान ओळीच्या विस्तारार्थ गुंफलेली कडवी या सर्वांपेक्षा अस्सल कविता निराळी असते. कोणत्याही कवितेत महत्त्वाची असते ती विशिष्ट भाववृत्ती. या भाववृत्तीशी तद्रूप झालेल्या निसर्गप्रतिमा किंवा संवेदना यातून उत्कृष्ट कविता निर्माण होते, याची जाणीव झाल्यानंतर पाडगावकरांच्या कवितेने विलक्षण अशी रूपे आविष्कृत केली-

*'जांभळी नीज ये, जांभळी नीज ये,*
*कंप काळे निळे*
*त्यांत छाया मिळे*
*जलदरुपें ध्वनी मंदिरातून ये*
*जांभळी नीज ये, जांभळी नीज ये...'*

विशिष्ट भाववृत्तीशी तादात्म्य पावलेल्या रंगसंवेदना आणि निसर्गप्रतिमा यांची सुंदर गुंफण असलेली ही कविता तथाकथित 'तर्का'ला हुलकावणी देते; असे त्यांनी म्हटले आहे.



अनुक्रमणिका

नंतरची पाडगावकरांची कविता एखाद्या विशिष्ट भाववृत्तीने भारलेल्या सूचक प्रतिमेतून उमलून येऊ लागली. 'एखाद्यां तरल अनुभवाचा अपरिहार्य असा सौंदर्याकार' अशा रूपात ती प्रकट होऊ लागली. काव्यरूप घेऊ पाहणाऱ्या या अनुभवाशी कवितेचे शब्द, त्यातील प्रतिमा आणि ध्वनी हे तिन्ही घटक एकरूप झालेले असतात, ही एकात्मता जेव्हा प्रत्ययाला आली, तेव्हा- 'सांडिली त्रिपुटी, दीप उजळला घटीं' या तुकारामांच्या अक्षरवाणीची प्रचिती आली, असे त्यांनी भारावून म्हटले आहे.

या साक्षात्कारानंतर अनुभवाच्या सूक्ष्म, सखोल रुपाने एक प्रकारचे झपाटलेपण आले. झाडाच्या मुळांनी भूमीच्या गर्भातून चैतन्य शोधून घ्यावे तशी ती अनुभूती अंतर्मनात पसरू लागली. गूढ, अनाकलनीय, तर्कातीत अशी ही जाणीव होती तरी कशी?- की मुळात ती जाणीवच हरवलेली होती?

कवी म्हणतात-

*'बुडतच जाणिव होती,*
*अनुभूतीच्या संथ गहन डोहात:*
*अचल समाधित होतें जेथें स्थिरावलेले पाणी*
*वारा बोलत नव्हता*
*नव्हती हालत पानें*
*आणि स्तब्धता होती*
*आर्त पापणीपरी पसरली पाण्यावर हलकेच...*
*शिशिरामधल्या गूढ पहाटे जैसा*
*समुद्र जावा धुवऱ्यात पार बुडून*
*तसेच होते बुडले*
*स्वत:च्याच गूढतेत क्षण ते सारे...'*

कवीच्या अंतर्मनात खोल पसरू लागलेल्या अनुभवातून आपोआप काहीतरी साठत - 'जमत'- होते. जिथे तर्क थिटा ठरतो अशीच ही- तर्कातीत- गूढ प्रक्रिया!

अनुभवाचे, संवेदनांचे पूर्वीचे एकेरी रूप जाऊन वेगवेगळे अनुभव, वेगवेगळ्या संवेदना यांच्या भावनात्मक नात्यांमधून फुललेली कविता वेगवेगळ्या स्तरांवर निरनिराळ्या रुपांत अभिव्यक्त होते.

कधी कधी वेगवेगळ्या ऐंद्रिय संवेदनांमधून जाणिवेची एखादीच छटा उत्कटतेने व्यक्त होते.

'थेंब' या प्रतिमेतून साकारणारी ही विलक्षण अनुभूती-

*'थेंब स्पर्शता पानाच्या हिरव्या टोकाला*
*उठू लागल्या होत्या माझ्या नसानसांतुन*
*तुरट... गोड... पोपटी झिणझिण्या*

रूप-रस-रंग-गंध-स्पर्श अशा अवघ्या ऐंद्रिय संवेदनांची एकात्मता येथे एका अत्युत्कट अनुभूतीत परिणत झाली आहे.

'कित्येकदा फक्त सूचक प्रतिमांमधून, मनातल्या गूढ संथ नि:शब्दतेत उमलणारा सृजनाचा क्षण मला व्यक्त करायचा असतो' असे पाडगावकर म्हणतात-

*'संथ निळे हे पाणी*
*वर शुक्राचा तारा*
*कुरळ्या लहरींमधुनी*
*शीळ घालितो वारा'*

या कवितेतील 'शुक्राचा तारा', सृजनाच्या त्या तेजस्वी क्षणाची प्रतिमा ठरतो. पाडगावकरांच्या मते- कवितेतून एखादे 'चित्र' उभे करणे हे कवितेचे स्थूल रूप झाले; पण वरीलप्रमाणे संवेदनांमधून जन्मणारी- उमलणारी कविता आपल्यासमोर चित्र उभे करीत नाही, तर तिच्यातील अनुभूती उत्कट संवेदनशीलतेने टिपून घ्यायच्या असतात.

आपल्या काव्यनिर्मितीकडे तटस्थतेने पाहतानाच पाडगावकर म्हणतात की, 'आपल्या काव्यनिर्मितीच्या तळाशी 'आत्मशोध' असतो.' हा शोध घेतानाच कळत-नकळत बरेच काही गवसत जाते- ज्यातून प्रतिभा तर फुलत जातेच, शिवाय अधिकाधिक



अनुक्रमणिका

परिपक्वता-प्रगल्भता येत जाते. याबाबत त्यांनी स्वत:च 'जिप्सी' आणि 'गिरकी' या दोन कवितांच्या निर्मितीविषयी सखोल ऊहापोह केला आहे, तो असा-

पाडगावकरांनी १९५३ साली लिहिलेली 'जिप्सी' ही कविता आणि १९५६ साली लिहिलेली 'गिरकी' ही कविता (संग्रह 'छोरी') या दोन्ही कवितांमधील प्रधान-सूत्र एकच आहे. ते म्हणजे 'विमुक्ततेची ओढ;' तथापि 'मूड'सारखा अजूनही 'गिरकी' ही कविता अधिक यशस्वी आहे, याचे कारण तिचा 'घाट' (form) असे ते म्हणतात. 'जिप्सी' कविता बरीचशी 'स्पष्टीकरणात्मक' आहे. 'प्रधान कल्पनेचा रुचकर विस्तार करताना योजलेल्या प्रतिमाही सांकेतिक आहेत. याउलट, 'गिरकी' कवितेतील प्रतिमासृष्टी सांकेतिकतेपासून दूर आहे. येथे भास कल्पनेच्या (Fantasy) पातळीवर राहून लौकिक सत्याचा निर्देश केलेला आहे. 'जिप्सी' कवितेपेक्षा 'गिरकी' या कवितेत विमुक्ततेची अनुभूती अधिक प्रत्ययकारितेने व्यक्त झाली आहे ती यामुळेच.

गिरकी या कवितेतील हिरव्या झाडावर बसलेला इवला पक्षी 'हिरव्या इथून-निळ्यापांढऱ्या तिकडे' जाण्याची उत्कट आस बाळगून- 'गेलेच पाहिजे मला...' असे गाणे आळवतो आहे.

'जिप्सी'लाही हीच ओढ आहे.

'जाचू लागते जिप्सीला ज्ञात विश्वाची चौकट
आणि जाणवते काही गूढ, अंधुक, पुसट

या मानसिकतेमुळे हा जिप्सी, मांडलेला खेळ मोडू पाहतो.

आपणच निर्मिले हे आपणच मोडू धजे

ही त्याची धारणा; पण 'गिरकी' कवितेतील मनोभूमिका, मोडून टाकण्याची किंवा 'सारे काही उधळून देण्याची' नाही. लौकिक सत्याचा स्वीकार करून पुन्हा परतायची त्याची तयारी आहे; पण 'आत्ता- या क्षणी मात्र त्याला मुक्तता हवी आहे-

'डोक्यावरचे डफ्फर छप्पर पिसासारखे दूर उडवू पाहणारा' तो 'खिडकीची हट्टी चौकट इथेच बसून पतंगापरी उंच उडवितो..' तरीही हे सारे लौकिक जीवन कुठेतरी जपून ठेवण्याचीही त्याची धडपड आहे-

*'एवढेच माझे ऐक जरा ग*

...........

*हे सारे ठेवशील ना जपुनी?*
*शपथ गळ्याची-*
*आल्यावर घेऊन सगळे ओझे*
*पुन्हा एकदा खांद्यावरती*
*पण आता*
*गेलेच पाहिजे मला*
*गेलेच पाहिजे मला...*

'जिप्सी' आणि 'गिरकी' या दोन्ही कवितांच्या अनुषंगाने कवीने आपल्या काव्यप्रवासाचा, भूमिका, निर्मिती, अभिव्यक्तीचा घाट अशा सर्व दृष्टिकोनातून मनोज्ञ असा वेध घेतला आहे. पाडगावकरांचे स्वत:च्या काव्यनिर्मितीकडे बघण्याचे ताटस्थ्य, त्यांची रसिक, आस्वादक दृष्टी आणि 'कविता' या प्रकाराबाबतचे एकूणच वृत्तिगांभीर्य हे सारे त्यांच्या जन्मजात प्रतिभेबरोबरच गाढ व्यासंगातूनही त्यांना लाभत आले आहे.

अस्सल निर्मितीतून कवीला मिळणारा 'स्वानंद' ही निखळ, विशुद्ध असतो. याबाबत पाडगावकर म्हणतात की, जेव्हा काही 'मिळविण्याची' धावदौड संपते, तेव्हाच हा निरामय आनंद गवसतो. तो बाजारात मिळत नाही. व्यावहारिक दृष्ट्या त्याला मोल नसेलही; पण तो आपल्या 'आत' असतो; म्हणूनच तो खराखुरा आणि अमूल्यही असतो. ते म्हणतात-

*'गाणं शब्दात मावत नाही*
*हावऱ्या हातात गावत नाही*

*गाणं सांगू येतं कुठून?'*
*डहाळीला ओंकार फुटून...'*

मनाच्या डहाळीला ओंकाराचे धुमारे फुटतात, तेव्हाच अनाहत नादाप्रमाणे गाणे प्राणात निनादू लागते. अस्सल निर्मितीचे प्राणतत्त्व हे असे असते.

खिडकीशी झुकलेले आंब्याचे झाड.. त्याच्या
*गर्द हिरव्या पानांकडे बघताना*
*माझे बघणे डवरले हिरव्यागार पानांनी!*
*माझे मिटलेले डोळे झाले त्या क्षणी*
*हिरवीगार वाट*
*मला घेऊन जाणारी*
*खोल खोल आत*
*मनातील स्तब्धतेत!*

निसर्गाशी एकात्म पावलेल्या भाववृत्ती आणि त्यातून निर्मितीच्या त्या क्षणी प्रत्ययास येणारा तो दिव्य साक्षात्कार!... नि:शब्दपणे स्वत:ला शोधत जाणारी सृजनाची ती चैतन्यानं रसरसलेली हिरवीगर्द वाट...!

तृणपाते, गवतफूल, झाडे, पाने, फांद्या आणि पाखरे या प्रतिमांमधून पाडगावकरांचे निर्मितीविश्व अक्षरश: फुलत, बहरत गेले आहे. मानवी आयुष्यातील फार मोठा अर्थ त्यांच्या कवितेने 'झाड' आणि 'पाखरू' या दोन प्रतिमांमधूनच लीलया पेललेला आहे.

*'फांदी असते गोपाळाच्या बासरीवरली धून*
*फांदी ही सुचलेली कविता झाडाला आतून...*
*भरलेली ही असे रिती अन् रितेपणी भरलेली*
*असणेनसणे ओलांडून ही स्वत:मधे शिरलेली...*

आपल्या 'असण्याच्या' आणि 'नसण्याच्या'ही पलीकडे जाऊन स्वत:च स्वत:चा शोध घेत जाणारी पाडगावकरांची कविताही अशीच आहे.

हिरव्या गवतपात्याप्रमाणे आपली कविता (आणि कवितेतून 'मी'ही) रुजून येत आहे असे पाडगावकरांनी कितीएक रचनांमधून म्हटले आहे. कवीची कवितेतून 'आत्मशोध' घेण्याची हृदयंगम रीती अशा वेळी प्रत्ययाला येते.-

*'जेव्हा माझं मन असं माझ्याशीच गातं*
*तेव्हा माझं कोणतं असतं माझ्याशी नातं?*
*आधीच्या माझ्याशी हे आधीचं नातं*
*मीच असतो माती आणि हिरवंगार पातं!*

कवीची ही एकतानता निसर्गाशी जडलेल्या एकात्म भावनेतूनच साधलेली, जितकी प्रत्ययकारी तितकीच थक्क करून जाणारीही आहे!

ही कविता कशी अचानक भेटते! याबाबत 'अचानक' या कवितेत पाडगावकर म्हणतात-

*'वास यावा फुलाचा पण फूल दिसू नये;*
*कानी यावेत सूर पण कुठून कळू नये;*
*असं आपण आश्चर्याच्या वाटेवर*
*आत आत स्वत:चा शोध घेत निघावं*
*........................*
*त्या क्षणी तिचं असं अचानक भेटणं*
*काहीतरी सुचावं अकल्पित तसं असतं :*
*सुरवंटाचं अचानक फुलपाखरू होतं*
*आतल्या आत फुलाभोवती रुंजी घालू लागतं*

कवितेच्या प्रवासात 'सुरवंटाचं फुलपाखरू' होत असल्याची ही अनुभूती पाडगावकरांनी आपल्या चिंतनशील गद्यलेखनातही मांडली आहे.

*'मीच तळे,*
*माझ्यातच कमळे फुलणारी*
*शब्दांची माझ्या फुलपाखरे*
*कमळांभोवती झुलणारी'*

मनाच्या जलाशयात कमलपुष्पाइतक्या सहजतेने उमलून येणारी कविता... आणि तिच्याभोवती रुंजी घालणारी शब्दांची फुलपाखरे... शब्दांचेच भ्रमर..?

निसर्गकवितांप्रमाणेच पाडगावकरांच्या प्रेमकवितेतूनही

निसर्गाचे अनेक विभ्रम साक्षित्वाने भेटत राहतात. निसर्ग, प्रीती आणि कविता यांची घातलेली मनस्वी सांगड रसिकाला मोहवूनही जाते आणि अंतर्मुखही करते.

अशीच 'आठवण' ही एक कविता-

*'कोऱ्या करकरीत फांदीवर*
*तिच्या नकळत अचानक*
*लुकलुकावं कोवळं पोपटीहिरवं पान*
*तशी तुझी आठवण*
*माझ्या मनात माझ्या नकळत*
*कविता होते!*

झाडे-फुले, गवत, पाने, पक्षी- पारवे, मोर, राघू यांच्याबरोबरच तारे-वारे, चंद्र-चांदण्या, काळोख-प्रकाश, ऊन-पाऊस, क्षितिज-आभाळ अशा सगळ्या निसर्गघटनांना पाडगावकरांच्या कवितेत कोणत्या ना कोणत्या रूपात महत्त्वपूर्ण स्थान मिळाले आहे. सुरुवातीला 'प्रतीके' म्हणून आलेल्या या घटना नंतरच्या प्रतिमासृष्टीत अनुभूतीशी तादात्म्य पावलेल्या दिसतात.

निसर्ग ही पहिली प्रेरणा, प्रीती ही तर आदिम प्रेरणा- यांबरोबरच पाडगावकरांच्या बालपणातल्या आठवणींमधून- स्मरणरंजनातूनही- त्यांच्या शब्दांनी कवितेचे हृदयस्पर्श असे रूप घेतले. त्या आठवणींनी येणारी व्याकुळता, आर्तता किंवा ते सारे हरपल्यामुळे वाटणारे वैषम्य यांचा अतिशय संयत तितकाच हृद्य आविष्कार कित्येक कवितांमधून झाला आहे.

*पणजोबांचं कोकणातलं*
*घर कधीच पडून गेलं*
*आता तिथं काहीच नाही-*
*पाखरासारखं उडून गेलं...*

अशा बालगीतातूनही कवीची ही मनस्वीपणे व्यक्त होते.

हीच व्यथा- वेदना- जेव्हा 'भ्रम' सारख्या कवितेत उमटते, तेव्हा त्या 'फॅण्टसी'सारख्या रचनेतूनही काळजाला पीळ पाडीत जाते-

**- भ्रम -**

*उडू लागली खिडकी*
*सुटे बिजागरांतून...*
*जुन्या चिंचोक्यांचे झाले*
*कोनाड्यात ओले क्षण...*
*ताक चाळताना बघे*
*आजी चपापून वर :*
*आजोबांचा जुना कोट*
*हलू लागे खुंटीवर...*
*जुने खोड खाकरून*
*म्हणे, "आण थोडं ताक..."*
*घेई झाकूनिया डोळे*
*माजघरात काळोख...*
*चुलीतून धुराचा ये*
*केस पिकलेला लोट...*
*एक कवडसा ठेवी*
*घट्ट ओठांवर बोट...*

मुंबई येथे १९५९ साली लिहिलेल्या या कवितेतून आपल्या गावा-घराशी, तिथल्या माणसांशी, वस्तूंशी, वातावरणाशी कविमनाचे जन्मभराचे जोडलेले नाते जाणवतेच; त्याचबरोबर त्या घराविषयीची विरहभावना (Homesickness) ही सातत्याने ध्वनित होत राहते. आज गूढ वाटावेत असे एकेकाळचे ते बंध, कवी आणि त्यांची कविता या दोन्हींशी घट्ट जखडलेले आहेत. कवितेतून त्या भावबंधांचा पुन:प्रत्यय घेताना कवी जणू ते क्षण पुन्हा अनुभवतात. ते सुरम्य बालपणच त्यांच्या कवितेत पुन्हापुन्हा जागत राहते-

*घरापुढल्या स्वच्छ मोकळ्या अंगणात*
*तुळशीचं वृंदावन;*

*हातात काठी घेऊन मी घोडा घोडा खेळायचो;*
*आजी माझी माझ्यामागे धावायची धापा टाकीत*
*जेवणाचं ताट घेऊन मला घास भरवायला!*

### कंदील

चाफा, जास्वंद, घर, कंदील, दूर, वेंगुर्ल्याचा पाऊस अशा कित्येक रचनांनी हरवलेल्या बालपणाचे रूप उत्कटतेने घेतले आहे. अभ्यासाच्या पुस्तकात जरी 'कोकण' हा शब्द आला, तरी मन कसे व्याकूळ व्हायचे!

*'कोकण हा शब्द आला*
*वर्गातल्या पुस्तकात*
*भणभण भणभण होऊ लागलं*
*तेव्हा माझ्या मस्तकांत!*
*मी डोळे मिटून घेतले*
*मला रडू आवरेना;*
*पणजोबांची हाक आली,*
*मला तोल सावरेना!*

अंतर्मनाला सतत साद घालणाऱ्या 'वेंगुर्ल्या'ची याद सतत जागती असल्याने कवीचे मन शहरात कधीच रमले नाही. सिमेंटचे, गुळगुळीत भिंतींचे कोणतेही घर त्यांना कधीच 'आपले' वाटले नाही आणि सामाजिक-राजकीय वास्तवाची धगधगती जाणीव जेव्हा कविमनाला जाळू लागली, तेव्हा त्यांच्या कवितेने तितकेच दाहक, प्रखर, जळजळीत रूप घेतले. वर्तमान परिस्थितीतील जातिवाद, धर्मवाद, संकुचित प्रांतीयता, निःसंकोचपणे चालणारे भ्रष्ट व्यवहार, गुंड प्रवृत्ती, दहशतवादी शक्ती या सर्वांमुळे वेळोवेळी व्यथित आणि संतप्तही होणाऱ्या कविहृदयातून त्यांच्या सामाजिक आणि राजकीय जाणिवेच्या कवितांनी जन्म घेतला. 'सलाम', 'विदूषक', 'उदासबोध', 'वात्रटिका', 'क्षणिंका', 'मोरू' अशा या काव्यसंग्रहांमधून तसेच गझलांमधूनही कवीने मानवी जीवनातील विकृती-विसंगती, अपप्रवृत्ती, अनिष्ट प्रथा यांच्यावर जोरदार शाब्दिक हल्ले चढविले आहेत. तुकोबांच्या अक्षरवाणीने भारावून जाणाऱ्या कवीने अशा रचनांमधून तुकोबांप्रमाणेच 'शब्दांचीच शस्त्रे' केलेली दिसतात-

'सलाम' या कवितेत 'सबको सलाम' म्हणताना
*'वटारलेल्या प्रत्येक डोळ्याला सलाम*
*शेंदूर थापलेल्या दगडाला सलाम*
*लाखो खर्चून बांधलेल्या देवळांना सलाम*
*देवांचे आणि धर्मांचे कंत्राट घेणाऱ्यांना सलाम...*
*भीतीच्या प्रत्येक ठेकेदाराला सलाम*
*सत्तेचा ट्रक चालवणाऱ्यांना सलाम*

ट्रकखाली चिरडलेल्या गांडुळांना, कुत्र्यांना सलाम...' असं म्हणत कवी आपल्या या 'परमपवित्र इत्यादी इत्यादी देशाला' सलाम असे म्हणून प्रचलित सामाजिक-राजकीय व्यवस्थेची उपहासगर्भ शैलीत विलक्षण खिल्ली उडवतात.

*'एक नेता बारामती गाव असून*
*बुद्धीच्या बाबतीत ठार झीरो होता,*
*तरी तेरा शिक्षणसंस्था त्यानं काढल्या,*
*शिक्षणाच्या क्षेत्रात असा हीरो होता!*
*अशी त्याच्या संस्थांची वाढली जंत्री*
*सध्या आहे सक्सेसफुल शिक्षणमंत्री!'*

इतक्या जहाल रीतीने आजच्या शिक्षणक्षेत्राचा समाचार कवी घेतात. त्याच वेळी सामान्य माणसाच्या अगतिकतेबद्दल मनस्वी हळहळत त्याच्या मर्यादांवरही नेमके बोट ठेवतात.

'शेजाऱ्यावर संतापून तो बायकोला म्हणाला,
"आता माझी तलवारच त्याला नेऊन दाखवितो."
बायको म्हणाली, "अहो, तलवार नेऊ नका,
"तिला नुसतीच मूठ आहे, पातं कधीच हरवलंय!"



अनुक्रमणिका

अन्यायाविरुद्ध, अत्याचाराविरुद्ध 'मूठ' आवळण्याखेरीज दुसरे कांहीच करू न शकणाऱ्या सामान्य माणसाची ही कथा म्हणजे विनोद नव्हे! हा विनोद असलाच, तर तो कारुण्याची, व्यथा-वेदनेची झालर असलेला असा श्रेष्ठ प्रतीचा विनोद आहे- ज्यामागे आजची सामाजिक शोकान्तिका आहे.

या वात्रटिका, क्षणिका म्हणजे अल्पाक्षरात केलेली अत्यंत मार्मिक अशी जीवनभाष्ये आहेत.

रामदासांचा दासबोध वाचला जातोच; पण 'आज' रामदास असते, तर आजची विपरीत जनस्थिती पाहून तेही उदास झाले असते आणि त्यांनी असा 'उदासबोध' लिहिला असता, असे पाडगावकर 'उदासबोध' या संग्रहासंबंधी म्हणतात. उदासबोधातील हे 'खुर्चीस्तवन'-

*'खुर्चीस असती चार पाय*
*ते न धरिता होतो अपाय*
*या चार पायांपुढे उपाय*
*न चले कुणाचा*

*खुर्ची असता बुडाखाली*
*पंडित गर्दभाची करी हमाली*
*खुर्ची नसता बुडाखाली*
*हमालही पुसेना...'*

अशाच चुरचुरीत, खुसखुशीत शैलीत लिहिलेले- नेतृत्वलक्षण, भाषणकला, नंगेपण प्रशस्ती, निवडणूकशास्त्र, लाचविज्ञान, बुळेपण शक्तियोग, आत्मज्ञान, मनुष्यजन्म, मेंढरायण असे अनेक समास मुळातून वाचण्यासारखे आहेत, हे दासबोधाचे केवळ विडंबन नाही. कवीच्या प्रतिभेने, शब्दकलेने येथे यच्चयावत मनुष्याजातीच्या डोळ्यात झणझणीत अंजन घातले आहे.

अशा प्रकारच्या सामाजिक, राजकीय आशयाच्या कविता लिहितानाही- 'मी कोणत्याही 'इझम'चा झेंडा खांद्यावर घेतलेला नाही. माझी कला, माझी 'कविता' हे माझे सर्वश्रेष्ठ 'इमान' आहे. कलावंत हा स्वतंत्र असतो. स्वतःच्या स्वातंत्र्याच्या प्रेरणेचे जतन त्याने केले पहिजे आणि ही प्रेरणा दडपून टाकू पाहणाऱ्या शक्तींचा निकराने प्रतिकार केला पाहिजे. माझा खांदा कोणत्याही 'पक्षा'चा झेंडा घेण्यासाठी नाही, तो फक्त 'पक्ष्यां'ना येऊन बसण्यासाठी आहे' असे खंद्या कवीला साजेसे उद्‌गार पाडगावकरांनी काढले आहेत. प्रखर वास्तवातही कवितेचा हिरवागार अंकुर कोळपू न देणारा हा जातिवंत कवी. भावाकूल, हळवी गीते लिहिणारा हा अतिसंवेदनशील कलावंत, समाजवास्तव साकारताना त्यांची अभिव्यक्ती होते. टोकदार तीव्र, ज्वलंत आणि जहरी नंतर तितक्याच उत्कटतेने ती पुन्हा येऊन भिडते मनाचा तळ गाठणाऱ्या अल्वार भावनांना!

'निरभ्र' ही त्यांची कविता या दृष्टीने किती बोलकी आहे!-

*'तिच्या काही रात्री होत्या किडलेल्या*
*काही उत्तान झिंगून बिघडलेल्या,*
*काही फसवून फसलेल्या, चिडलेल्या,*
*काही खोल जिवाला भिडलेल्या*
*..............................*
*पाण्यानें निळें आभाळ ल्यावें*
*तसें बालपण तिच्या डोळ्यांत यावें*
*एकटेपणी : तेवढ्यावरच जगत राही,*
*स्वतःपल्याड नितळ होई*

मनाच्या तळात दडलेली ही नितळता हा निसर्गाने मानवाला दिलेला अमूल्य असा 'वर' आहे. निसर्गाची ही ठेव पाडगावकरांसारख्या कवीने आयुष्यभर जपली. त्यातूनच निपजली त्यांची जीवनाला भिडणारी कविता.



अनुक्रमणिका

केशवसुतांनी आपल्या दैवदत्त प्रतिभेतून निसर्ग, प्रीती, सामाजिक जाणीव, काव्यप्रतिभा, गूढगुंजन अशा विविध प्रकारच्या कविता लिहिल्या. भा. रा. तांबे यांनी यांबरोबरच आध्यात्मिक दृष्टिकोनातूनही जीवनार्थ शोधणारी कविता लिहिली. बा. भ. बोरकरांच्याही पारमार्थिक जाणिवेच्या कविता बऱ्याच आहेत. मंगेश पाडगावकरांनी अशा सगळ्याच प्रकारांमध्ये काव्यरचना केली, ती पूर्वसूरींचे काही संस्कार घेऊन; तथापि त्यांची कविता त्यांच्या स्वयंप्रज्ञेने आणि स्वयंप्रतिभेने आपली स्वतंत्र वाट चोखाळत राहिली. मराठी साहित्यविश्वात आज त्यांच्या कवितेचे विशिष्ट असे स्वतंत्र स्थान आहे. त्यामागे आहे त्यांची साधना आणि अखंड चिंतन!

आपल्या काव्यसाधनेत त्यांनी 'माणूस' हे केंद्रस्थान मानले. 'माणूस' समजावून घेणे- त्याच्या सुख-दु:खाचा शोध घेणे हे आपल्या कवितेचे प्रयोजन असल्याचे पाडगावकर पुन:पुन्हा सांगतात. 'माणूस' समजावून घेणे आणि त्यासाठी अभिव्यक्तीचा योग्य घाट (form) निवडणे या माझ्या कवितेच्या दोन बाजू आहेत असेही ते आवर्जून सांगतात. 'माणसाचा' शोध घेतानाच ते आत्मशोधापर्यंत जातात आणि मग साहजिकच त्यांची कविता 'पारलौकिका'चा वेध घेऊ लागते. जीवनावर समरसून शतदा प्रेम करणारा हा कलंदर कवी त्यापलीकडील रहस्य शोधू पाहतो. सत्य, शिव आणि सुंदराचा ध्यास घेत विश्वात्मक शक्तीच्या ओढीने प्रवास करीत राहतो-

*ताथै ताथै ताथै हो, ताथै हो*
*विठ्ठल ताथै ताथै माझा, रखुमाई ताथै हो*
*पाऊस आला ताथै ताथै होउनिया वनमाळी*
*अवघे अंबर व्यापुन आला घेइ घोंगडी काळी*
*असुन विदेही ताथै माझ्या नांदू लागे देही*
*शुभशकुनाचा शुभ्र मोगरा फुलला माझ्या गेही*

कवीची आद्य प्रेरणा म्हणजे निसर्ग. त्या निसर्गसंवेदनांमधूनच आत्मतत्त्वापर्यंत पोहोचण्याचा हा प्रवास अनोखाच! संतसाहित्यातील 'घोंगडी' किंवा 'मोगरा' या प्रतिमा परमार्थातील गूढार्थ घेऊन येतात. कवीची भावावस्थाही येथे त्यांच्याशी नाते सांगणारीच आहे.

---

## १ एप्रिल २०१० पासूनचे आजीव सभासद

१) परांजपे कमल वि., निगडी
२) पांडे संजिवनी, चिंचवड
३) सिंगलवार संजय सुधाकर, निगडी
४) कुलकर्णी अनंत दत्तात्रय, चिंचवड
५) कुलकर्णी संजीवनी अनंत, चिंचवड
६) वेलियावेट्टील चंद्रशेखर सुकुमारन, कोरेगांव
७) वेलियावेट्टील सीना चंद्रशेखर, कोरेगांव
८) बर्गे चंद्रकांत रावसाहेब, चिमणगाव
९) जाधव बाळकृष्ण विठोबा, खंड (नांदगाव)
१०) शिंदे शिवाजी हिंदुराव, कोरेगांव
११) पोतदार हेमंत दत्तात्रय, कोरेगांव
१२) बर्गे सुभाष शंकरराव, कोरेगांव
१३) घारगे विजयकुमार शंकरराव, कोरेगांव
१४) पवार पांडुरंग सदाशिव, कोरेगांव
१५) सुर्यवंशी अरुण आनंदराव, कोरेगांव
१६) डेरे अनंत विष्णु, कोरेगांव
१७) डेरे महेंद्र अनंत, कोरेगांव
१८) घारगे धैर्यशील वियजकुमार, कोरेगांव
१९) बर्गे भारती चंद्रकांत, कोरेगांव
२०) दिक्षित संजय वसंतराव, कोरेगांव
२१) शहा मिलींद रसिकलाल, कोरेगांव
२२) बर्गे राजन रामचंद्र, कोरेगांव
२३) जगताप रमेश महादेव, कोरेगांव
२४) बर्गे प्रभाकर घोंडीराम, कोरेगांव
२५) पेंडसे ज्योती संदीप, पुणे
२६) पेंडसे मोनिका संदीप, पुणे
२७) नावंदे किशोर नागोराव, पुणे
२८) वाघमारे राजेन्द्र दत्तात्रयराव, पुणे
२९) भागवत शशिकांत नारायण, पुणे
३०) कुटे अमोल उमाकांत, पिंपरीपेंढार
३१) शिरोळे वसुंधरा दिनकरराव, पुणे



अनुक्रमणिका

पाडगावकरांच्या आजीने 'देव' नेहमी माणसांमध्ये पाहिला. 'मंगेशा, तू पोटभर जेवलंस, म्हणजे माका देव पावता' म्हणणाऱ्या या आजीच्या दृष्टीने दारावर येणारा याचक हा देव असे. हे संस्कार मंगेशानेही आपोआपच आत्मसात केले.

*'मी कधीच नाही म्हटले की तू दे मज दर्शन'*

किंवा

*'तुझे गीत गाण्यासाठी सूर लावू दे रे'*

असे म्हणणाऱ्या या कवीने निसर्गात, माणसांत देव पाहिला असल्यास नवल नाही. त्यामुळेच सगुण साकारापेक्षा निर्गुण-निराकाराची आस त्यांच्या अशा रचनांमधून जाणवते. यातूनच-

*'काही सांगायचे नाही,*
*काही मागायचे नाही*
*निळ्या चैतन्याचा कंद*
*माझ्या प्राणात आनंद*
*मेघ नसूनही आज*
*मोर नाचतच राही;*

अशी काहीशी उन्मनी अवस्था ते अनुभवू पाहतात. या लौकिक जगाच्या पल्याड जाऊ पाहणारा त्यांच्यातला 'तो' पक्षी कोणत्या तरी अलौकिक अनुभूतीने भारला जातो. शेवटी लौकिक जीवन म्हणजे 'मृगजळ' अशी प्रचिती येते-

*'सावध राया, राया रे,*
*मृगजळ माया, माया रे*

किंवा

*भ्रमाचा हा खेळ आहे*
*अजूनही वेळ आहे*
*नाहीतरी पुढे आहे काळोखाची खाय बापा!*
*अंती उरे 'हाय' बापा!'*

असे म्हणतानाच-

*'नाही उरली प्यास रे!*
*जन्ममरण लंघून राहिला*
*नित्यनिरंजन ध्यास रे!*
*नाही येणे नाही जाणे*
*सरला सर्व प्रवास रे!*

अशी प्रतीती येते. तेव्हा-

*'बन्सी ध्यान लागल्याची,*
*बन्सी प्राण जागल्याची;*
*कोऽहं कोऽहं विचारिता*
*बन्सी वाजू लागल्याची...*

अशी आत्मप्रत्ययाची बासरी अंतरंगात वाजू लागते.

पारामार्थिक तत्त्व अतिशय काव्यात्मतेने मांडणाऱ्या अशा रचना पाडगावकरांच्या परिणत, उन्नत काव्यकलेची आगळी वेगळी साक्ष देतात.

'ऐहिक उपभोगाच्या शेवटी हळहळच राहते', हे कविवर्य केशवसुतांचे उद्गार यावेळी आठवतात.

राधा-कृष्णाच्या अनेक रचना, होरी, रास, विरहिणी, खूण अशा कविता, पाडगावकरांच्या कवितेचा हा पैलू अकस्मात उजळवून जातात-

*'ने सजणाच्या गावा रे,*
*पैलथडीच्या काळोखातुन*
*ऐकू येतो पावा रे!*

अशी रचना भा. रा. तांबे यांच्या 'कळ पळभर, मात्र खरे घर ते' या जाणिवेशी नाते सांगते.

*'ऐलथडी अन् पैलथडी*
*नदी धुंद वाहे दुथडी*
*ऐलथडी अन् पैलथडी*
*काळोखाची गूढ गढी*

अशा रचनेमधून मानवी जीवनाचे रहस्य, जन्म-मरणाची गूढता यांचा पार शोधण्याचा प्रयत्न दिसतो.

तुझी खूण जपताना, सुकतीच्या ओठांवर, झुडूप, एक क्षण, दिवा अशा कवितांमधून हाच गूढार्थ डोकावत राहतो.

मुळात 'निसर्ग' हीच एक अगम्य शक्ती. त्याचे गूढ न उलगडणारेच. आणि मानवी जीवनाचे मर्मही सहजी न आकळणारेच! या दोन्हींच्या साथीने पाडगावकरांच्या कवितेने अनुभवविश्वाचे जे विविधांगी दर्शन घडविले, ते मोहून टाकणारे, तितकेच अंतर्मुख करणारेही आहे.

काव्यनिर्मितीचा आणि विश्वव्यापाराचा तळ शोधताना या कवीने सतत आत्मचिंतन केले. आत्मशोधाची ही यात्रा आत्मतत्त्वापर्यंत-आत्मबोधापर्यंत नेण्याची आकांक्षा बाळगली. प्रकटीकरणाच्या अपरिहार्यतेतून ती अभिव्यक्त केली. या गहन अंतहीन भासणाऱ्या प्रक्रियेचा हा शोध असाच चालू राहतो का? याचे उत्तरही संदिग्धच आहे. पाडगावकरांच्याच 'काठावर' या कवितेत याबाबत ते म्हणतात-

*जरि आहे सारे काही*
*तरि काहीसुद्धा नाही*
*मी काठावरूनी माझी*
*पाहतो तहान प्रवाही*
*फुलण्याची घाई नाही*
*सुकण्याचे भयही नाही*
*हा काठ प्रवाहासंगे*
*स्तब्धतेत बुडुनी जाई.*
*काठावर होता कोण?*
*मी मला विचारून पाही*
*हा प्रश्न नि उत्तर त्याचे*
*स्तब्धताच होउनि राही*

◇◇◇

**शीला निपुणगे**
२ कस्तुरी सोसायटी, ३७१ ब शनिवार पेठ,
पुणे ४११०३०. भ्रमणभाष- ९८९०३५४३६२

---

## १ एप्रिल २०१० पासूनचे आजीव सभासद

३२) नार्वेकर योगेश दत्तात्रय, पुणे
३३) पासलकर मुकुंद किसनराव ऊर्फ शाहीर दादा पासलकर
३४) कर्वे प्रभाकर ---, पुणे
३५) इंगळे रिना केशवराव, पुणे
३६) खुंटे प्रशांत राजाराम, पुणे
३७) देवरे अभय शरद, पुणे
३८) टाकळे शुभांगी ---
३९) पतकी वीरेंद्र विठ्ठल, यशवंतनगर
४०) बर्वे संदीप-रजनी जयंत, पुणे
४१) विव्हांस नीला राजेंद्र, पुणे
४२) सुतार संजय शंकर, कोल्हापूर
४३) पवार विलास जयराम, पुणे
४४) ठुवे विजयकुमार गोविंदराव, पुणे
४५) आढारी प्रकाश रामचंद्र, पुणे
४६) खाडे बापू चंद्रकांत, रूईसावळा
४७) भोसले प्रिती भाऊसाहेब, पुणे
४८) पाटणकर सुभाष यशवंत, पुणे
४९) पाटील भाग्यश्री सतिश, पुणे
५०) उदगिरी संतोष रामचंद्र, सोलापूर
५१) जोशी विजय अंबादास, अ. नगर
५२) बारणे राजेश भालचंद्र, पुणे
५३) उत्तुरे विजय शंकरराव, पुणे
५४) बाठे जितेंद्र शामराव, पुणे
५५) माळी सुचेता उल्हास, सांगली
५६) सावळे प्राची दामोदर, पुणे
५७) मोरे स्नेहा सोपानराव, पुणे
५८) पाटील सदाशिव शशिकांत, पुणे
५९) मुळे दीपक प्रभाकर, बारामती
६०) जगताप सुनील शिवाजीराव, बारामती
६१) आगवणे सचिन शंकरराव, बारामती
६२) कुलकर्णी प्रशांत नरसिंह, बारामती
६३) गोजारी रामचंद्र महादेव, बारामती
६४) गुजर दीपक बबनराव, सोलापूर
६५) गुजराथी ज्योती हेरंब, सोलापूर
६६) गुजर हेमलता किरण, सोलापूर
६७) गुजराथी हेरंब पूनमचंद, सोलापूर
६८) खडके संजय विठ्ठल, सोलापूर
६९) हिरेमठ मल्लीकार्जुन सदय्या, सोलापूर
७०) गाविंदे श्रीकांत अनिल, सोलापूर

## सदाहरित, ज्येष्ठ समीक्षक
## श्री. शंकर सारडा यांचे अभीष्टचिंतन!



महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे, सन १९८८ ते ९२ आणि १९९५-९७ या काळातील संपादक, ज्येष्ठ समीक्षक, बालसाहित्य चळवळीचे जाणकार, पत्रकार, स्तंभलेखक आणि साहित्यसंमेलन, प्रकाशक परिषद, मुद्रण परिषद इत्यादींच्या अधिवेशन-संघटनात्मक कार्यामुळेही सुपरिचित असलेल्या श्री. शंकर सारडा यांच्या वयाला ४ सप्टेंबर २०१२ रोजी ७५ वर्षे पूर्ण झाली, यानिमित्त त्यांचे अभीष्टचिंतन करण्याची संधी घेत आहोत.

शंकर सारडा यांनी १९५० ते आजपर्यंत अर्धशतकाहून अधिक काळ सातत्याने, विविध भूमिकांमधून लक्षणीय लेखन केले आहे. बालकांसाठी १२ कथासंग्रह आणि दोन कादंबरिका-तीन नाटके, १४ समीक्षा ग्रंथ, १२ संपादन-ग्रंथ, ९ अनुवाद असे अर्धशतकाहून अधिक ग्रंथ त्यांच्या नावावर आहेत. 'साधना' साप्ताहिकाचे सहसंपादक, दै. ऐक्य (सातारा)चे संपादक, 'ललित'चे कार्यकारी संपादक, दै. देशदूत (पुणे) चे संपादक, महाराष्ट्र टाइम्स्चे दिल्ली-प्रतिनिधी व रविवार पुरवणीचे संपादक, दै. लोकमित्र (मुंबई) रविवार पुरवणीचे संपादक म्हणून ते सुपरिचित आहेत.

बी.ए.ला मराठी विषयाचे सुवर्णपदक मिळवून मुंबई विद्यापीठाची एम.ए. (इंग्लिश) पदवी प्राप्त केल्यानंतर 'मास कम्युनिकेशन'च्या अभ्यासासाठी त्यांना हार्वर्ड युनिव्हर्सिटीची नीमन-फेलोशिप मिळाली. याबरोबर १९ देशांचा प्रवास केल्याने त्यांचे अभ्यासक्षेत्र विस्तीर्ण झाले.

सध्या शंकर सारडा 'ग्रंथजगत'चे कार्यकारी संपादक म्हणून कार्यरत आहेत. त्यांची लेखणी चिरतरुण आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदतर्फे त्यांचे अभीष्टचिंतन!

–संपादक, म. सा. पत्रिका, पुणे.



अनुक्रमणिका

## बा.भ. बोरकर जन्मशतसांवत्सरिक

संपा. सु. म. तडकोडकर

– सीमा होसूरकर

'कविवर्य बा. भ. बोरकर जन्मशतसांवत्सरिक' हा संपादित ग्रंथ असून, त्यात नामवंत अठरा विचारवंतांनी लिहिलेले लेख समाविष्ट करण्यात आले आहेत. ह्या संपादनात बोरकरांच्या साहित्याचा परामर्श घेतला असून, मराठीतील छंदविचारांचा सखोल व व्यापक विचार करणारे लेखही अंतर्भूत केले आहेत. ह्या सर्व लेखांचे नेटके संपादन डॉ. सु.म. तडकोडकर यांनी अत्यंत चिकित्सपणे केले आहे.

एखाद्या प्रतिभावंताचा अभ्यास करताना अनेक गोष्टींची पथ्ये पाळावी लागतात. त्याचा काळ, त्याचे स्थान, त्याची स्वभाववैशिष्ट्ये त्याबरोबरच त्या व्यक्तिमत्त्वातील प्रतिभेचे नव-नवोन्मेष टिपणेही महत्त्वाचे असते. कवी बा. भ. बोरकर आणि त्यांचे साहित्य यावर झालेल्या मान्यवरांच्या चिंतनातून ह्या लेखसंग्रहाची निर्मिती झाली आहे. त्यामुळे हा लेखसंग्रह विद्यार्थ्यांना आणि रसिकांनाही वाचनीय, अभ्यासनीय झाला आहे.

'काव्यातील छंदोरचनेचे महत्त्व' या ग्रंथाच्या पहिल्याच लेखात श्री. मनोहर नाईक यांनी कवितेचे भाषास्वरूप सांगताना गद्यभाषा व पद्यभाषा यातील वेगळेपण नोंदविले असून, कवितेच्या रचनेत वैविध्य आणून काव्यानुभवातील आशय अधिक टोकदार, सौंदर्यपूर्ण व हृद्य करता येतो, असे प्रतिपादन केले आहे आणि त्या अनुषंगाने पद्य व छंद यांच्यातील परस्परसंबंधही स्पष्ट करताना भाषापटुत्व व छंदज्ञान यांच्या प्रभावाचे स्वरूपही नोंदविले आहे. हा लेख भाषाअभ्यासकांना आणि विशेषत: कवींना अभ्यासनीय आहे.




डॉ. रमेश धोंगडे यांनी 'भाषेची लय पद्यरचना : इंग्रजी व मराठी काव्य' या लेखात भारतीय व पाश्चात्त्य काव्यविचाराच्या दृष्टीने भाषाशास्त्राचे महत्त्व समजून दिले आहे. काव्यातील वृत्त हे शब्दाच्या ध्वनिरूपावर आधारलेले असते. अर्थपरिवर्तन झाले तरी ध्वनिरूप शब्द नित्यच राहातो, हे त्यांचे मत अभ्यासकांना विचारप्रवृत्त करायला लावणारे आहे. मराठीतील शब्दाघात अर्थदृष्ट्या महत्त्वाचा नसला, तरी विशिष्ट अवयवप्रधान बनतो. याकडेही डॉ. धोंगडे यांनी अभ्यासकांचे लक्ष वेधले आहे. उदाहरणादाखल त्यांनी रामदास, तुकाराम, मोरोपंत यांच्या काव्यलेखनातून लघुगुरूचे उपयोजन कसे सोईस्करपणे होते. याबाबतही विवेचन केले आहे.

डॉ. प्रभाकर जोशी यांनी 'मध्ययुगीन व अर्वाचीन मराठीतील निवडक काव्यप्रकार' या लेखात 'ओवी', 'अभंग', 'आरती', 'भूपाळी', 'काकड आरती', 'भारुड' आदी भक्तिपररचना आणि त्याचबरोबर 'लावणी', 'पोवाडा' आणि आधुनिक काव्यातील छंद यावर विस्तृतपणे चर्चा केली आहे. त्याचा प्रत्यय लेख वाचताना येतोच.

'मराठी गझल : वृत्ताच्या अंगाने एक शोध' ह्या लेखात डॉ. अविनाश सांगोलेकरांनी गझल व गझलवृत्ते यातील सूक्ष्म बारकावे निदर्शनास आणून दिले आहेत. त्या दृष्टीने त्यांनी अमृतराय, मोरोपंत ते माधव ज्युलियन, सुरेश भट यांच्या गझल रचनेचा साक्षेपाने परामर्शही घेतला आहे. त्याचबरोबर गझलेतल्या



अनुक्रमणिका

अधिकारी व्यक्तींच्या नोंदीचीही नोंद घेतल्यामुळे हा लेख समृद्ध झाला असून, गझलकार व गझल संशोधक यांना उपयुक्त व मार्गदर्शनपर आहे.

बोरकरांची प्रतिमासृष्टी हे प्रेम, संगीत आणि निसर्ग यांनी भारलेली आणि त्याहीपेक्षा जास्त अस्सल भारतीय संस्कृतीतून स्फुरली आहे. हे सर्वश्रुत आहेच. त्याचाच परामर्श डॉ. वसंत पाटणकर, यांनी 'बा. भ. बोरकर यांच्या कवितेतील प्रतिमासृष्टी' ह्या लेखातून घेतला आहे. बोरकरांच्या काव्यातील प्रतिमांचा आढावा घेताना डॉ. पाटणकर म्हणतात, 'बोरकरांच्या प्रतिमासृष्टीला मर्यादा असली, तरी ती वैशिष्ट्यपूर्ण आहे. रंग, रेषा, रूप, नाद, स्पर्श, रस अशा अनेकविध संवेदनांनी युक्त आहे. प्रतिमासृष्टीत रंगाची, नादांची विविध उधळण अनुभवावयास मिळते. या अनेकविध संवेदनांचा आविष्कार मोठ्या प्रमाणात करून मराठी कवितेच्या प्रतिमासृष्टीत आणि काव्यभाषेत बोरकरांनी लक्षणीय भर घातली आहे. (पृ. १२७) ह्या लेखकाच्या विचारांचा प्रत्यय बोरकरांच्या कविता वाचताना रसिकांना येतोच.

उदा. *'घनांमनांतून टाळ-मृदंग*
*तनूंत वाजवि चाळ अनंग...*
*मल्हाराची जळांत धून*
*वीज नाचते अधूनमधून (गितार)*

'बा. भ. बोरकर यांची गीतरचना' ह्या लेखात डॉ. अविनाश आवलगावकरांनी बोरकरांच्या कवितेतील भावगीतांची रचना म्हणजे बोरकरांच्या आत्म्याचा हुंकार आहे असे म्हटले आहे. हे निर्विवाद सत्य आहेच. त्याहीपुढे जाऊन डॉ. आवलगावकरांनी उदाहरणादाखल काही कविता दिल्या असून, ते म्हणतात, 'गीत, कविता ही कमीतकमी शब्दांतून अधिक जीवनार्थ प्रसवणारी साहित्यकृती असते, म्हणून त्यातील प्रत्येक शब्दाला आणि त्याच्या जागेला महत्त्व असते. गीत तर अधिक संवेदनशील असते. बोरकरांच्या गीतात ही संवेदनशीलता अधिक तीव्रतेने जाणवते. बोरकर योग्य शब्दांचा वापर करून गीताची आशयघनता अधिक परिपक्व करतात. (पृ. १४०) ह्या लेखातून 'अल्पाक्षर हा कवितेचा विशेष गुण आहे' हे तर स्पष्ट होतेच. त्याचबरोबर हा लेख विशेषत्वाने कवींना व संगीत क्षेत्रात असणाऱ्यांसाठीही उपयुक्त आणि संपन्न आहे.

असं म्हणतात की, भा.रा. तांबे यांच्या काव्यदृष्टीचा दिवा करून बोरकरांना अनेक नव्या वाटा धुंडाळता आणि चोखाळता आल्या. त्याचाच परामर्श डॉ. अक्षयकुमार काळे यांनी 'बाळकृष्ण भगवंत बोरकर यांची मराठी कविता' या लेखातून घेतला आहे. तांबे आणि बोरकर यांच्या प्रेमानुभूतीतील पृथगात्मता अधोरेखित करताना डॉ. काळे यांनी बोरकर आणि तांबे यांच्या काव्याविष्काराशी निगडित असलेल्या जडणघडणीविषयी विवेचन केले आहे.

डॉ. अरुणा दुभाषी यांनी 'बा.भ. बोरकर यांच्या कवितेतील भाष्याविष्कार' या लेखात निर्व्याज रोमॅण्टिक दृष्टिकोनाविषयी चर्चा केली आहे, तर प्रा. आशा मणगुनकर यांनी 'बोरकरांच्या साहित्यातील प्रादेशिकता' ह्या लेखात एखाद्या प्रदेशातील लोकांच्या वृत्तीची व तिच्याशी संलग्न असलेल्या प्रादेशिकतेच्या संकल्पना स्पष्ट केल्या आहेत. हे दोन्ही लेख विशेष लक्षवेधी आहेत.

'प्रोजवाले पोमाट बोरकर' या लेखात डॉ. मणगुनकर यांनी थेट बोरकरांशीच संवाद साधन त्यांच्या व्यक्तित्वाचे आणि समग्र साहित्याचे मनोज्ञ दर्शन वाचकांना घडविले आहे. प्रत्यक्ष बोरकरच आपल्याशी बोलताहेत, असा अनुभव लेख वाचताना येतो.

'बा.भ. बोरकर यांच्या कादंबऱ्यांतील सामाजिकता' या लेखात डॉ. वासुदेव सावंत यांनी बोरकरांच्या लेखनाविष्कारविषयीच्या चिंतनातून बोरकरांच्या लेखनात स्त्री व्यक्तिरेखांनाच अधिक प्राधान्य मिळते हे त्यांनी 'भावीण', 'मावळता चंद्र', 'प्रियकामा', 'अंधारातील

वाट' या कादंबऱ्यांतील काही अंश लेखात देऊन पटवून दिले आहे, त्याचा प्रत्यय कादंबरी वाचनातून येतोच.

'बाकी बाब बोरकर यांच्या कोंकणीतील कविता लेखनाचे स्वरूप' ह्या लेखात प्रा. प्रियदर्शिनी तडकोडकर यांनी बोरकरांचे कोकणीतील लेखन आणि त्यांनी गोमन्तकासाठी केलेले कार्य यावर प्रकाश टाकला असून, बोरकरांचे कोकणी भाषेविषयीचे प्रेम आणि तत्कालीन सामाजिक परिस्थिती हेही ह्या लेखातून सुस्पष्ट होते. भाषा अभ्यासकांसाठी हा लेख विशेष महत्त्वाचा आहे.

या पुस्तकात एकूण २१ लेख असून, सर्वच लेख 'अभ्याससंपृक्त' आहेत. काही लेख वगळता इतर लेखांतून बोरकरांच्या व्यक्तित्वाचे, त्यांच्या साहित्याचे वैविध्यपूर्ण दर्शन रसिकांना घडते. बोरकरांची भाषा निसर्गाची, आशयघन प्रेमाची! ती ज्या शब्दकलेतून प्रकटते तिला पोर्तुगीज सौंदर्यवेधाचा, कोकणी लोकपरंपरेचा आणि अस्सल भारतीय संस्कृतीचा स्पर्श आहे. दर्याशी संबंधित लोकपरंपरेमुळे बोरकरांच्या साहित्यात चंद्र, चांदणे आणि समुद्र यांची अपरिमित रूपे आहेत. तसेच कोकणी, पोर्तुगीज मराठी अशा तीन संस्कृतींची एकत्र घडणही आहे. ह्या सर्वांचा मिलाफ बोरकरांच्या साहित्यातून कसा आविष्कारीत झाला आहे त्याचं विलोभनीय चित्रण म्हणजे हे पुस्तक होय.

या लेखसंग्रहाचे आणखी एक वैशिष्ट्यच म्हणजे बा.भ. बोरकर यांच्या साहित्याची तसेच त्यावर लिहिलेल्या लेखनाची सूची या संग्रहात अंतर्भूत केली आहे. त्यामुळे हा लेखसंग्रह संपन्न आणि समृद्ध असून 'संग्रही' ठेवण्यासारखाच आहे.

◇◇◇

बा. भ. बोरकर
ज़न्मशतसांवत्सरिक
संपा. डॉ. सु.म. तडकोडकर
प्रतिमा प्रकाशन, पुणे.

**सीमा होसूरकर**
'आगम' आयडियल कॉलनी, कोथरुड, पुणे ३८.
७५८८०७०५५४, ९७६६०२७७८३
seemahosurkar@gmail.com

## अभीष्टचिंतन!



गुलबर्गा (कर्नाटक) येथील प्रसिद्ध कवी व्यंकटेश वळसंगकर यांनी नुकतीच आपल्या वयाची ६१ वर्षे पूर्ण केली आहेत. मराठीचे अभ्यासू प्राध्यापक असणाऱ्या वळसंगकरांनी बृहन्महाराष्ट्रात राहून निष्ठेने मराठी साहित्यसेवा केली आहे. आभाळलेणं, सांज क्षितिज, काळं कोंदण, आठव डोह हे कवितासंग्रह, 'शब्दसंगत' हा समीक्षाग्रंथ आणि 'कानेकोपरे' हा लेखसंग्रह. अशी त्यांची समृद्ध साहित्यसंपदा आहे. या निगर्वी, निरलस आणि मनस्वी लेखक-कार्यकर्त्याचे 'मसाप'तर्फे अभीष्टचिंतन!

प्रमुख कार्यवाह आणि
मसाप, पुणे.



अनुक्रमणिका

ग्रंथसमीक्षा

# भारतीय शिक्षण पद्धतीचे सम्यक् समालोचन : डॉ. सौ. अरुंधती जोशी

– डॉ. न. म. जोशी

भारताचे वर्तमान राष्ट्रजीवन अनेकविध समस्यांनी ग्रस्त झालेले आहे. राजकारण, अर्थकारण, समाजकारण इ. क्षेत्रांत हलकल्लोळ आहे. हा हलकल्लोळ दूर होण्यासाठी विचारकल्लोळ अत्यंत आवश्यक आहे. असा शैक्षणिक विचारकल्लोळ ग्रंथरूपात आपणासमोर मांडला आहे डॉ. सौ. अरुंधती जोशी यांनी.

'संस्कृती' ही संज्ञा खूप व्यापक अर्थाने योजिली जाते. संस्कृतीची आठ अंगे असतात. राजकारण, अर्थकारण, समाजकारण, धर्म, साहित्य, कला, विज्ञान आणि शिक्षण ही संस्कृतीची आठ अंगे असतात. या अष्टांगांचे संतुलन असते; ही अष्टांगे परस्परपूरक असतात तेव्हा 'संस्कृती' विकास पावते; आणि तोल बिघडला की संस्कृतीचा ऱ्हास होतो असा इतिहास आहे. या अष्टांगांमध्ये समतोल राखण्याचे, त्यासाठी मनुष्यबळनिर्मिती आणि विचारनिर्मितीचे कार्य करण्याचे काम या अष्टांगांपैकी शिक्षण हे अंग करीत असते. म्हणूनच शिक्षणक्षेत्राला 'जीवनाची प्रयोगशाळा' असं म्हटलं जातं.

या शिक्षणक्षेत्राचा वैचारिक अंगानं शोध घेतलेला आहे, तो 'भारतीय शिक्षण पद्धती' या पुस्तकात.

दोनशे अठ्याण्णव पृष्ठांच्या या ग्रंथात एकूण दहा प्रकरणे आहेत. वैदिक कालखंडापासून आधुनिक काळातील शिक्षण पद्धतींचा मागोवा घेताना लेखिकेने प्राचीन भारतीय शिक्षण पद्धतीलाच अग्रक्रम दिलेला दिसतो. आपल्या मनोगतात लेखिकेनेच सांगितले आहे की, संस्कृत व मराठी हे दोन्ही विषय लेखिकेचे अभ्यासविषय आहेत. शिक्षिका या नात्याने लेखिकेचा दीर्घकाळ शिक्षणक्षेत्राशी संबंध आलेला आहे. "प्राचीन संस्कृत साहित्याचा अभ्यास करताना त्यातून प्रतिबिंबित होत असलेल्या शिक्षणपद्धतीने लक्ष वेधून घेतले" अशी नोंद लेखिकेने केली. अर्थातच प्राचीन भारतीय शिक्षणपद्धतीचे सर्व विशेष व त्याचे प्रारूप या ग्रंथात दिसणे अपेक्षित आहे.

'विवेकभ्रष्टांना भवति विनिपातः शतमुखः' अशाप्रकारे वर्तमान समाजाची अवस्था आहे. भर्तृहरीने प्राचीन काळीच हे वर्णन करून ठेवले आहे. ही अवस्था बदलून विवेकनिष्ठ समाज निर्माण व्हायचा असेल, तर शिक्षणाद्वारा उच्च जीवनमूल्यांचे बीजारोपण झाले पाहिजे. या जीवनमूल्यांचा विचार प्राचीन संस्कृत वाङ्मयाचा धांडोळा घेऊन लेखिकेने या ग्रंथात मांडण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला आहे.

या ग्रंथाची बलस्थाने कोणती याचा शोध घेतला तर असे लक्षात येते की या ग्रंथाची पाच बलस्थाने आहेत.

पहिले बलस्थान म्हणजे या ग्रंथाची आशयघनता।

वेदकालीन शिक्षणपद्धतीचा सघन आशय या पुस्तकात लेखिकेने ग्रथित केला आहे. तत्कालीन शिक्षणपद्धतीचा विचार करताना वेदकालीन समाजजीवनाचे व तत्कालीन संज्ञा-संकल्पनांचेही दर्शन लेखिकेने यथार्थपणे घडविले आहे.

संस्कृतीचा विकास शिक्षणाने होतो. पण संस्कृतीच्या विकासासाठी आर्थिक पाठबळही आवश्यक असते. आधुनिक काळात तर अशा आर्थिक पाठबळाशिवाय शिक्षणव्यवहार चालता राहाणे अशक्य होऊन बसले



अनुक्रमणिका

आहे. वैदिक काळी आर्यांनी आर्थिक स्थैर्य प्राप्त करून घेतले होते. कृषिपालन, पशुपालन, धातुकाम आणि पक्क्या मालाचे उत्पादन करून आर्यांनी अर्थसंपन्नता प्राप्त करून घेतली होती. ऋग्वेदकाळात वरील गोष्टी अर्थजीवनात महत्त्वाच्या होत्या. एवढेच नव्हे, तर आधुनिक काळात औद्योगिक वा शैक्षणिक प्रगतीसाठी कर्ज ही जी कल्पना आहे ती ऋग्वेदकाळातही होती. ऋण हा समाजमान्य व्यवहार होता. पण त्याचवेळी ऋणमुक्त होऊन परलोकी जाण्याची कल्पनाही समाजमनावर बिंबवली होती. ऋणसंस्था ही खासगी संपत्तीच्या संचयाची, पण त्याचवेळी सामाजिक उपयोगाच्या वितरणाची एक लोकमान्य व राजमान्य संस्था होती. अशा अनेक गोष्टी या ग्रंथात वाचावयास मिळतात.



आठव्या वर्षी उपनयन संस्कार झाल्यावर मुलाला गुरुगृही पुढील शिक्षणासाठी पाठवत असत. आजच्या शिक्षणपद्धतीत मुलांना प्रवेश देण्याची प्रक्रिया कशी आहे (CEI) याचा विचार केला तर तेव्हा जी प्रवेशपद्धती होती तिचे महत्त्व अधिक समजते.

गुरुगृही विद्यार्थ्यांना प्रवेश देताना त्याच्या तीन क्षमतांचे परीक्षण केले जाई. मानसिक, शारीरिक, बौद्धिक. शिवाय त्याची ज्ञानलालसा किती याचेही निरीक्षण केले जाई.

या ग्रंथातील पुढील प्रकरणात आणि वाङ्मयाचे संदर्भ दिले आहेत. रामायण, महाभारत, स्मृतिग्रंथ, पुराणे इ. ग्रंथांमध्ये कोणता शिक्षण विचार आला आहे; याचा धांडोळा लेखिकेने घेतला आहे.

या ग्रंथाचे परिशीलन करताना आपणाला ज्या सर्वसामान्य गोष्टी माहीत आहेत, त्यांच्यापेक्षा काही वेगळी घटिते ज्ञात होतात.

उदाहरणार्थ,

गुरुकुल पद्धतीमध्ये विद्यार्थी गुरूच्या घरी जाऊन (आश्रमात) विद्याध्ययन करीत असत, ही सर्वसामान्य समजूत! पण लेखिकेने एक प्रत्ययकारी उदाहरण दिले आहे.

द्रोणाचार्य कौरव-पांडवांना शिकविण्यासाठी त्यांच्या राज्यातच नव्हे तर राजवाड्यात आले. रामायण काळातही गुरू राजवाड्याजवळ येऊन राहिल्याचे दाखले आहेत.

अर्थातच येथपासूनच शिक्षणपद्धतीच्या गाडीचा रूळ बदलला असावा; आणि गुरुशिष्य संबंधांबाबत वेगळा आराखडा तयार झाला असावा.

आधुनिक काळात शिक्षणशास्त्रात जे श्रमप्रतिष्ठा हे मूल्य शिकविले जाते किंवा श्रमप्रतिष्ठा या मूल्याचा संस्कार करण्यासाठी जो अभ्यासक्रम आखला जातो, त्याच्या पाऊलखुणा प्राचीन काळातही ठळकपणे आढळतात. उदा. श्रीकृष्णाने सांदिपनी ऋषींच्या आश्रमात शारीरश्रमाचे काम केले होते. या ग्रंथाचे दुसरे बलस्थान आहे म्हणजे त्याचे संदर्भमूल्य! प्राचीन भारतीय व विशेषत: संस्कृत वाङ्मयातील अनेक संदर्भ या ग्रंथात सहजी मिळू शकतात. त्यामुळे तौलनिक अभ्यास करणाऱ्या संशोधकांना हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त वाटेल. ज्या शैक्षणिक संदर्भांचा अर्थ आपणाला एरवी सहजपणे लावता येणार नाही ते या ग्रंथात लेखिकेने लावून दाखविले आहेत. उदाहरणार्थ, शिक्षकांच्या नेमणुका हा नेहमीच चर्चेचा विषय होत राहिला आहे. शिक्षकांची नियुक्ती कोणी करावी? याबाबत स्वायत्तता असावी की सरकारचा अंकुश असावा याबाबत आजही शैक्षणिक क्षेत्रात सर्वत्र चर्चा होत असतात. लेखिकेने सभापर्वातील एका श्लोकाचा दाखला देऊन असे भाष्य केले आहे की, "सरकारने शिक्षकांची नियुक्ती करण्याची प्रथा

या काळात सुरू झाली.'' तरीही विद्वान आचार्यांचे महत्त्व अबाधितच होते; हा मुद्दाही महत्त्वाचा आहे. आणखीही असे अनेक महत्त्वाचे संदर्भ आहेत.

म.फुले, महर्षी कर्वे यांनी स्त्रीशिक्षणाची वाट खुली करण्यासाठी आयुष्य वेचले. महाभारत काळातही स्त्रियांना शिक्षण देण्याची प्रथा होती असे लेखिकेने वनपर्वातील एका श्लोकाच्या आधारे सांगितले आहे. द्रौपदीचे वर्णन करताना,

'प्रिया च दर्शनीया च पंडिता च पतिव्रता'

असे केले आहे. द्रौपदी ही पंडिता होती. म्हणजेच तिचे शिक्षण झालेले होते. मात्र येथे हेही सांगितले आहे की, 'स्त्रियांना शिक्षण कोणत्या प्रकारे देत' मुलांप्रमाणे स्त्रियांना गुरुगृही जाऊन शिक्षण देत नसत. मात्र घरच्या घरी मुलींचा अभ्यास घेतला जात असे. घरातीलच विद्वान ज्येष्ठ मंडळी, घरी येणारे अनागत आणि कधीकधी येणारे ऋषि-महर्षी यांच्याकडून स्त्रियांना शिक्षण दिले जात असे; आणि त्यांना देण्यात येणाऱ्या शिक्षणाची पद्धती कोणती होती? संवाद, वाद आणि चर्चा अशा विविध पद्धतीने स्त्रियांना शिक्षण दिले जात असे. स्त्रियांना वेदविद्या शिकवीत असल्याचे स्पष्ट उल्लेख आढळत नाहीत. पण गार्गी, मैत्रेयी यांसारख्या स्त्रिया पंडितसभेतही सहभागी होत असत. त्याअर्थी त्या स्वयंअध्ययन करून विद्या संपादन करीत असल्या पाहिजेत; अशा निष्कर्षाप्रत येता येते.

या ग्रंथाचे तिसरे बलस्थान म्हणजे पाश्चात्त्य शिक्षण विचाराची चर्चा या ग्रंथात केली आहे. ही चर्चा अत्यंत त्रोटक आहे. पण ती केली आहे. त्यामुळे ग्रंथाचे संदर्भमूल्य वर्धित झाले आहे.

प्लेटो, कॉमेनिअस, रुस्पे, पेस्टॉलॉझी, मॉंटेसरी या प्राचीन व अर्वाचीन काळातील शैक्षणिक विचारवंतांच्या विचारांचा मागोवा लेखिकेने 'आधुनिक शिक्षणपद्धती' या प्रकरणात घेतला आहे. हा मागोवा घेताना भारतातील काही शिक्षण आयोगांचाही विचार लेखिकेने केला आहे. भारताला स्वातंत्र्यपूर्व काळातील सार्जंट कमिशनपासून स्वातंत्र्योत्तर काळातील राधाकृष्णन कमिशन, मुदलियार कमिशन, कोठारी आयोग, राममूर्ती आयोग असे अनेक शैक्षणिक आयोग झाले. यापैकी लेखिकेने कोठारी आयोग आणि राममूर्ती आयोग यांचेच संदर्भ जास्त दिले आहेत. तरीही ते महत्त्वाचे आहेतच. प्रत्येक आयोगाने मूल्य शिक्षणावर भर दिलेला आहे.

या ग्रंथाचे चौथे बलस्थान शिक्षणविचाराचे समायोजन. प्राचीन काळापासून आधुनिक काळापर्यंत, हजारो वर्षांचा काळ एका छोट्या संपुटात एकत्रित करणे हे अवघड काम आहे. अशावेळी अनेक संदर्भ सुटतात, अनेक संदर्भ अस्थानी आहेत असे वाटणे शक्य असते. तसे या ग्रंथातही काही ठिकाणी झाले आहे. पण लेखिकेची कसरत या ठिकाणी ध्यानात येते. या विस्तृत शिक्षणविचाराचे समायोजन करणे ही अवघड जबाबदारी लेखिकेने पेलली आहे. त्यामुळे या ग्रंथाचे स्वरूप 'गागर में सागर' असे झाले आहे.

या ग्रंथाचे पाचवे बलस्थान म्हणजे बोलके मुखपृष्ठ आणि उत्तम दाणेदार छपाई. भारतीय शिक्षणपद्धती हे ग्रंथनामातील तीन शब्द एकाखाली एक मुद्रित करून त्यांना वेगवेगळे रंग दिले आहेत. त्या रंगांवरून काळबोध होतो. भारतीय या शब्दाला तांबूस (केशरी) रंग भूतकाळ सूचित करतो, शिक्षण शब्दाचा पांढरा रंग वर्तमान सूचित करतो, तर प्रकृतीचा हिरवा रंग भविष्य सूचित करतो. आपल्या राष्ट्रध्वजाचेही हे तीन रंग या ग्रंथनामात समाविष्ट केले आहेत. हे मुखपृष्ठ अत्यंत कलात्मक, सूचक, अर्थवाही असे आहे.

या ग्रंथाची बलस्थाने सांगितली. आता काही 'शबलस्थाने' ही सांगणे आवश्यक आहे. कोणत्याही उत्तम ग्रंथाला सूची जोडणे आवश्यक असते. व्यक्तिनामसूची, स्थलनामसूची असेल किंवा सर्वसाधारण संदर्भसूची असेल, ती असणे आवश्यक असते. या महत्त्वाच्या ग्रंथाच्या शेवटी सूची नाही ही अभ्यासकांना

जाणवणारी त्रुटी आहे.

दुसरी महत्त्वाची त्रुटी अशी की, लेखनात विस्कळितपणा पुष्कळच आहे. ग्रंथलेखनाचेही एक व्यवस्थापनशास्त्र असते. त्यांचा विचार करून लेखिकेने प्रकरणांची योजना केली असती, संदर्भांची नोंद केली असती, तर ग्रंथाला अधिक बांधेसूद रूप प्राप्त झाले असते. यासाठी एकच उदाहरण देतो. लेखिकेला शिक्षणपद्धतीवर ग्रंथरचना करावयाची आहे. मग शिक्षणपद्धतीची जी विविध अंगे आहेत किंवा अभ्यासविषय आहे व त्यानुसार प्रकरणांची व त्यांतील मुद्दे-उपमुद्दे यांची रचना करणे आवश्यक होते. उदा.

शैक्षणिक तत्त्वज्ञान, शैक्षणिक समाजशास्त्र, शैक्षणिक मानसशास्त्र, शिक्षणपद्धती (Method) स्त्रीशिक्षण, मूल्यशिक्षण, शिक्षक विद्यार्थी संबंध, अभ्यासक्रम अशाप्रकारे प्रकरणांची रचना करून प्राचीन व अर्वाचीन शिक्षणपद्धतींचा जो सुटासुटा आढावा घेतला आहे तो त्या त्या प्रकरणात किंवा विभागात एकत्र घेता आला असता. त्यामुळे एकेक प्रकारचा घटक त्या-त्या पृष्ठांमध्ये संपूर्णपणे तौलनिक स्वरूपात वाचावयास मिळाला असता. अभ्यासकांची व सर्वसामान्य वाचकांची छान सोय झाली असती. उदा. स्त्रीशिक्षणाचा संदर्भ शोधायचा तर प्रथम प्राचीन विभाग वाचायचा, मग आधुनिक विभाग वाचायचा आणि संदर्भ प्राप्त करून घ्यायचा. इतका खटाटोप करावा लागू नये या त्रुटी म्हणता आल्या नाहीत; तरी 'ग्रंथरूप' येण्यासाठी त्यांचा विचार व्हावा. तरीही,

एका उत्तम, वाचनीय, संदर्भमूल्य असलेल्या शैक्षणिक ग्रंथाबद्दल लेखिका प्रशंसेस पात्र आहे.

◇◇◇

---

## १ एप्रिल २०१० पासूनचे आजीव सभासद

७१) रावल विनोद कांतीलाल, सोलापूर
७२) दोशी संजय हिरालाल, सोलापूर
७३) जाधव संजय लक्ष्मण, बारामती
७४) परकाळे प्रदीप जयवंत, बारामती
७५) मोरे संजय भिकाजी, बारामती
७६) गुजर अनुराधा जितेंद्र, बारामती
७७) महाडिक प्रिया अमर, बारामती
७८) भोसले अशोक कुंडलीकर, बारामती
७९) महाडीक अमर दत्तात्रय, बारामती
८०) तांबोळी झाकीर अहमदभाई, बारामती
८१) कुंभार इंदुमती राजेन्द्र, बारामती
८२) महाडीक अक्षय दत्तात्रय, बारामती
८३) गुजर जितेन्द्र बबनराव, बारामती
८४) गुजर वरुण किरणराव, बारामती
८५) कुंभार राजेन्द्र दगडु, बारामती
८६) गुजर प्राची दीपक, बारामती
८७) जाधव सुचेता संजय, बारामती
८८) देव गणेश मोरेश्वर, बारामती
८९) कुलकर्णी श्रीकांत मधुकर, पुणे
९०) हेगडे दत्तात्रेय शिवराम, पुणे
९१) कमलाकर गौरव बावासाहेब, पुणे
९२) गोखले विद्या श्रीराम, पुणे
९३) रणशूर गीतांजली ज्ञानेश्वर, पुणे
९४) जगताप अनंत हरि, पुणे
९५) पाटील मोहन शामराव, पुणे
९६) पाटील अविनाश नारायण, पुणे
९७) वाणी शांताराम दामोधर, पुणे
९८) वाणी जगन महादू , पुणे
९९) जाधव अनिल शंकरराव, पुणे
१००) बंग सुनील श्रीराम, पुणे
१०१) मोरे देवीदास पंडीत, पुणे
१०२) गायकवाड सुनील पोलाद, पुणे
१०३) चव्हाण दिनेश कृष्णाजी
१०४) पाटील प्रकाश गंभीरराव
१०५) पिंगळे विनोद जगन्नाथ
१०६) ठोंबरे चंद्रकांत एकनाथ
१०७) निकम गौतमकुमार रामदास
१०८) बजाज लालाचंद व्ही
१०९) धुमाळ अण्णा कृष्णा
११०) बागुल बासिंग नामदेव
१११) बागुल प्रतिभा जयसिंग
११२) चौधरी सुरेश हरदास
११३) चव्हाण विनायक यशवंतराव
११४) बागड अनिल वामन
११५) ठोके ज्ञानदेव देवसिंग
११६) महाजन मधुलिका शिरीष
११७) मालपुरे संतोष दामोदर
११८) पाटील भरतसिंग जोहारसिंग
११९) पाटील अजय प्रतापसिंग
१२०) राजपूत सुमित्रा केशरसिंग
१२१) साळुंके कविता विजय
१२२) देशमुख किरण एफ्.
१२३) पाटील विजय भिमराव
१२४) साळुंखे साहेबराव एम्.
१२५) वाणी भालचंद्र काशिनाथ
१२६) वाणी वसंत रामदास
१२७) बागडू त्र्यंबक नारायण
१२८) पाखले विजय पुंडलीक
१२९) कोनकर भालचंद्र लक्ष्मण

## शाहीर — पुंडलिक फरांदे

– प्रा. संग्राम गोपीनाथ थोरात

शाहीर पुंडलिक फरांदे यांची अनेक गीते लोकांच्या ओठांवर आजही रेंगाळताना दिसतात. हे त्यांच्या गीतलेखनाचे यश आहे. त्यांच्या लोकगीतांनी आबालवृद्धांना रिझविले आहे. त्यांनी गायिलेल्या लोकगीतांतून याची प्रचीती येते. अस्सल ग्रामीणता, गीतरचनेतील कृषिजीवनाचा आविष्कार व त्याच्याशी संलग्न असणारे भटक्या विमुक्तांचे जीवन, मानवी मनाविषयीचे विश्लेषण, सहकाराचा आग्रह व सत्यशोधकी शाहिरी हे त्यांच्या लोकगीतांतून येणारे प्रमुख विषय आहेत.

सातारा जिल्ह्यातील आनेवाडी (ता. जावली) हे मूळ गाव असणाऱ्या शाहिरांचे बालपण खेड्यात गेल्याने त्यांच्या लोकगीतांतून अस्सल ग्रामीण शब्द येतात. ग्रामीण जीवनातील रीतिरिवाजांचा अनुभव त्यांना असल्यामुळे त्यांनी आपल्या काव्यरचनेत त्यांचा चपखल वापर केलेला दिसून येतो. त्यांच्या 'डिंगच्याँग डिच्याँग वाजावलं । उपाशी वऱ्हाड झोपावलं' या गीतातून शाहिरांनी समाजाचे सूक्ष्म निरीक्षण केल्याचे दिसून येते. ह्या निरीक्षणातून त्यांना ज्या गोष्टी खटकल्या त्यांच्यावर गाण्यातून त्यांनी टीका केली. लग्नात अनावश्यक खर्च केला जातो, पण वऱ्हाडी मात्र उपाशीच झोपतात; याचे दुःख शाहिरांनी प्रस्तुत गीतातून व्यक्त केले आहे. मानपानापोटी व भांडणापायी सर्वांनाच उपाशीच राहावे लागते; याची खंत व्यक्त करताना शाहीर म्हणतात,

*"एकाच दिवशी, दोन लग्ने होती ।*
*मानापानासाठी, झाल्या बाचाबाची ।।*
*चांगल्या अन्नात, कालावली माती ।*
*अशी आमची नीति, सांगू मी किती ।*
*फरांदे म्हणतो, हे नडलं"*[१]

एच.एम.व्ही.ने ध्वनिमुद्रित केलेले हे गीत लोकसंगीताचा एक उत्तम नमुनाच बनलेला आहे. ह्या गीताने महाराष्ट्रातील तमाम आबालवृद्धांना ताल धरायला प्रवृत्त केले. असे असामान्य लोकप्रियता मिळविलेले हे शाहिरांचे सुप्रसिद्ध लोकगीत आहे. तसेच शाहिरांची भाषा साधी, सोपी असल्याने गीताच्या सौंदर्यात भर पडलेली आहे. वऱ्हाडी व त्यांचा तोरा, नवऱ्याचे मिरवणे, गावकऱ्यांचा मानपान, साखरपुड्याचा विधी, लग्नातील बाचाबाची या सगळ्या गोष्टींचे वर्णन शाहिरांच्या ग्रामीण जीवनाच्या सूक्ष्म निरीक्षणाचे प्रत्यंतर घडवितात.

लोकशाहीर फरांदे यांच्या गीतरचनेत कृषिजीवनाचा आविष्कार आहे. कृषिरंजन आणि कृषिसंस्कार त्यांनी आपल्या रचनेतून साधलेला आढळतो. समकालीन, समाजजीवन आणि राजकारण यांचे रंग-तरंगही त्यांच्या गीतरचनेत उमटलेले आहेत. शाहिरांनी 'शेती सुधारणा', 'भलं गडी दादा भल रं' व 'शेताला पाणी देताना' अशी तीन भलरी गीते, 'सोन्याचा दिस आज हायरं' (सुगीचा आनंद), 'निघाली रानी गुरं' या गीतांतून कृषिजीवनाचा आविष्कार घडविला आहे. शाहिरांनी गायलेले 'भलं गडी दादा भल रं!' हे भलरीगीत म्हणजे लोकगीताचा उत्कृष्ट नमुना आहे. शेताची नांगरणी करणारा कामकरी, कुळवणारी मुलं-बाळं, खुरपणी करणारी हौसाआक्का आणि हालगी वाजवणाऱ्या नाऱ्या व्हलार यांचा उल्लेखही गीतातून येतो. चांदण्या रातीत पिकलेली ज्वारी शाहिरांना मोत्यावानी दिसते, तिच्या ताटांचा सळसळ आवाज, आंबराईची झालर, गुलजार शेकोटीचा रंग, गुलाबी थंडी, चंदेरी शालू पांघरलेले आभाळ या सर्व गोष्टी शेतकऱ्यांच्या मनाला आनंद देतात आणि आनंदून शेतकरी म्हणतो,



अनुक्रमणिका

*"मध्यान रातीची गातुयां भलरं ।*
*डप कड्याचा होतुया गजर ॥*
*हालगी वाजवतुया नाऱ्या म्हलारं ।*
*जोमानं काम आता होणारं ॥*
*भलरं तुझी भलरं गडी दादा भलरं ।*

शाहिरांनी प्रस्तुत गीताला दिलेली वाद्यांची साथ, यमकांचा योग्य वापर व ग्रामीण शब्दांचा चपखल वापर ह्या विशेषांमुळे वाचकांच्या मन:पटलावर ज्वारीचे डोलणारे शिवार उभे राहाते. प्रस्तुत गीतही एच.एम.व्ही.ने ध्वनिमुद्रित केलेले असून, अखिल भारतीय पातळीवर झालेल्या लोकसंगीताच्या निवडीमध्ये (इ.स. १९६९) शाहिरांच्या ह्या शेतकरी गीताची महाराष्ट्रातून निवड झाली होती. हे या गीताचे श्रेष्ठत्व आहे.

लोकशाहीर पुंडलिक फरांदे यांच्या वाङ्‌मयीन व्यक्तित्वाचा वेध घेताना त्यांची सहकारावर असणारी श्रद्धा प्रकर्षाने जाणवते. समाजाचे होणारे अध:पतन पाहिल्यावर संवेदनशील मनाच्या शाहिरांना दु:ख होते. 'अशा कचाट्यात जगायचं कसं' या लोकगीतातून महागाईचा कहर व हरामखोरीला आलेला बहर या कारणांमुळे गोरगरिबांच्या जीवाला घोर पडला आहे. त्यांचे जगणे असह्य झाले आहे. त्यातच समाजातील प्रत्येकानेच आपल्या व्यवसायात स्वार्थाला पहिले स्थान दिल्याने समाज भ्रष्ट होत आहे. अशी खंत शाहीर व्यक्त करतात. पण यातून मार्ग काढण्याचा विधायक सल्लाही शाहीर देतात.

*"जाणीवेचा इथे, आहे अभाव*
*विचार क्रांतीने, बदलू स्वभाव*
*सहकार्याने लागेल निभाव*
*फरांदे सांगे आपणा हे खास"*[३]

अशा प्रकारे सहकाराच्या अनिवार ओढीमुळे शाहिरांनी सकारात्मक विचार देऊन सहकार्याची कास धरण्याचे आवाहन केले आहे. शाहिरांच्या इतरही गीतांतून सातत्याने सहकाराचा गजर केलेला आहे. 'सहकार्याने गाठू आघाडी' (गाव सुधारणा गीत) हे गीत तर सहकाराचा एक आदर्श नमुनाच आहे. गावातील सर्वजण एकत्र आले तर ग्रामसुधारणा ही अशक्य गोष्ट नाही हे पटवून सांगण्यासाठी लोकगीताची सुरुवात 'मोठ्या डौलानं हान तुझी गाडी । सहकार्यानं गाठू आघाडी' अशी समर्पक केली आहे. प्रत्येक खेड्याची सुधारणा झाल्यास आपल्या भारताची ख्याती जगात होईल. त्यामुळे अशी ग्रामसुधारणा सहकारातून व्हावी असे शाहिरांना मनोमन वाटते.

शाहीर पुंडलिक फरांदे यांच्या लोकगीतांतून भटक्या-विमुक्तांचे जीवनही प्रतिबिंबित झालेले आहे. त्यात स्वाभाविकता व सूक्ष्मता आहे. धनगरांची मेंढरे (मेंढरं चालल्याती मुलखावर), नंदीबैलवाले (नंदीबैल आला गं दारी!) माकडवाले, डोंबारी (डोंबारी गीत) इ. त्यांच्या गीतांचे विषय झाले आहेत. सर्वसामान्य जनजीवनात समस्या ठरणाऱ्या प्रथा आणि नाती यावरही शाहिरांनी गीतरचना करून समाजाच्या नजरेत अंजन घातले आहे. 'आला जावई पाहुणा' (भारूड) ही रचना मनुष्यस्वभाव व सामाजिक परंपरा यांचे अप्रतिम दर्शन देणारी आहे. शाहीर लिहितात,

*"जावईबापू आहे । भलताच ऐंदी ।*
*त्यांना पाहिजे आहे । पलंग आणि गादी ॥*
*यासाठी जावईबापू । बायल्यागत रूसल्यात ।*
*अन् शाहीर फरांदे म्हणतात । कोपरा धरून बसल्यात ॥'*

अशा अनेक वेगवेगळ्या रचना करून शाहिरांनी लोकगीतांचे दालन समृद्ध केले आहे. लोकसंस्कृती, लोकसाहित्य, लोककला आणि लोककलाकार यांना शाहीर फरांदे यांनी आपल्या गीतरचनेत उजाळा दिला. प्रतिष्ठा दिली. संत एकनाथांच्या रचनेप्रमाणे भारूड रचना करून त्यांनी विनोदाच्या अंगाने लोकरंजनातून लोकशिक्षण दिले आहे.

शाहीर पुंडलिक फरांदे यांचे वेगळेपण म्हणजे ते म. फुल्यांच्या सत्यशोधक समाजाचे व विचारांचे खंदे प्रचारक होते. सत्यशोधक समाजाची विचारसरणी

हसवत, खेळवत, समाजातील दोषांवर उपहासगर्भाने टीका करून आत्मपरीक्षण करायला लावणारा आणि विचार अंत:करणात खोलवर रुजविण्याचे सामर्थ्य असणारा शाहीर म्हणून संपूर्ण महाराष्ट्र शाहिरांना ओळखतो. शाहिरांचे गुरू केशवराव विचारे (गुरुजी) यांचे 'मन' ह्या विषयावरील व्याख्यान ऐकून त्यांचे मन सत्यशोधक बनले. सत्यशोधक चळवळीचे प्रचारक कवी शंकरराव बारावकर यांचे प्रतिभाशाली पोवाडे ऐकून फरांदे यांनाही त्या काळी स्वत: गाणी करण्याची स्फूर्ती आली"[५] अशी आठवण शाहीर आत्माराम पाटील सांगतात. त्यामुळेच शाहिरांच्या गीतांतही मनाचा वेध घेण्याचा प्रयत्न होतो. 'मन अभ्यासी असावे, धन वाढीसी लावावे ॥' अशी रचना करून लोकांना उपदेश केला आहे. शाहीर पुढे म्हणतात,

*"मन सबळ प्रेमळ । ज्ञान आरसा निर्मळ ।*
*विश्व निरखूनी पहावे । मन अभ्यासी असावे ॥*

शाहिरांची ही छोटी रचना आहे; परंतु त्यामध्ये मोठे ज्ञान भरलेले आहे 'मन अभ्यासी असावे' असे म्हणतात त्यांना ते 'आध्यात्मिक असावे' असे म्हणावयाचे आहे. त्यांचे हे लोकगीत अभ्यासल्यावर समाजसुधारक आणि संत यांच्या कार्याचा सुंदर मिलाफ शाहीर फरांदे यांच्या व्यक्तिमत्त्वात झालेला आढळतो. आपल्या काव्यात त्यांनी मनाविषयी जे विश्लेषण मांडले आहे. त्यात संत तुकाराम व संत रामदासांच्या तत्त्वसंदेशाचा स्पर्श आहे व त्याला लोकसाहित्याचा बाज आहे. असे निदर्शनास येते.

अशा प्रकारे शाहीर पुंडलिक फरांदे यांच्या काव्यनिर्मितीमुळे शाहिरांनी शाहिरी वाङ्मयाचे दालन समृद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. 'लोकगीत' ह्या प्रकाराची विपुल रचना करून शाहिरांनी हा प्रकार प्रगल्भ व समृद्ध केला आहे. वरील प्रमुख विषयांशिवाय शाहिरांनी वैविध्यपूर्ण विषय हाताळून लोकगीतांची रचना केली. आपल्या गोड आवाजात सादर करून लोकांची मने तयार केली. त्यांचे मनोरंजन केले. त्यांच्या आवाजात लोकगीतांच्या ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध झाल्या. शाहिरांच्यामुळेच आज महाराष्ट्रात लोकसंगीत जिवंत राहिले आहे. असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

## संदर्भ सूची


१. लोकशाहीर पुंडलिक फरांदे : कृत 'लोकगीते' प्रकाशक सत्यशोधक विद्यार्थी संघ, सातारा, प्रथम आवृत्ती, १९९५, पृ.क्र. ८
२. तत्रैव : पृ.क्र.२८
३. तत्रैव : पृ.क्र.७
४. तत्रैव : पृ.क्र.३२
५. (संपा.) गुजर जयवंत : 'महाराष्ट्र लोकशाहीर पुंडलिक फरांदे', स्मरणिका १९६९
६. लोकशाहीर पुंडलिक फरांदे : कृत 'लोकगीते', उनि पृ. क्र. १६


◇◇◇


**प्रा. संग्राम गोपीनाथ फरांदे**
किसनवीर महाविद्यालय वाई,
भ्रमणभाष - ९६०४०४६०८४



रेग्युलेशन ऑफ न्यूजपेपर्स (सेन्ट्रल रूल्स १९५६, नियम क्र. ८ अन्वये) 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'ची मालकी व इतर तपशिलासंबंधी –
**निवेदन**
नियतकालिकाचे नाव : 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'
प्रसिद्धीचा काळ/भाषा : त्रैमासिक/मराठी
संपादक : डॉ. सुधाकर प्रल्हाद कुलकर्णी
रा. पत्ता : 'सूर' ७, गायकवाड कॉलनी, सावेडी मार्ग, अहमदनगर ४१४००३ (राष्ट्रीयत्व भारतीय)
प्रकाशक : प्रा. मिलिंद गोविंदराव जोशी, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक मार्ग, पुणे ३०
रा. पत्ता : बी/१/१२ रविराज टेरेस, सुखसागरनगर, कात्रज, पुणे ४६ (दूरभाष - ०२०/२४४७५९६३) (स.१० ते १२ दु. ४ ते ७)
राष्ट्रीयत्व : भारतीय
मुद्रक : स्मिता प्रिंटर्स, १०१९ सदाशिव पेठ, पुणे ३०
प्रकाशक स्थळ : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक मार्ग, पुणे ४११०३० (महाराष्ट्र राज्य - भारत) (दूरभाष : ०२०/२४४७५९६३)
मी, प्रा. मिलिंद गोविंदराव जोशी, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक मार्ग, पुणे ४११०३०; असे जाहीर करतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे खरा व बरोबर आहे.
– प्रा. मिलिंद गोविंदराव जोशी (प्रकाशक)




अनुक्रमणिका

## भारतीय हास्यमौक्तिकांचे स्मरण

– सौ. अनघा ठोंबरे

प्राचीन भारतीय साहित्याची प्रवृत्ती काहीशी गंभीर आहे. वेद, उपनिषद, गीता, महाकाव्ये, नाटके, गीते, सुभाषिते, स्तोत्रे यांचा स्वर तत्त्वज्ञानात्मक, उपदेशपर, भारदस्त, विदग्ध स्वरूपाचा आहे. अभिजात साहित्यात प्रामुख्याने सूत्र, सिद्धांत, चर्चा आहे; पण त्या काळातही विपुल मनोरंजनपर साहित्य आहे. त्यात शब्दचमत्कृती, शब्दक्रीडा, कोडी, उखाणे, प्रहेलिका आहेत. इतकी व्याकरणबद्ध श्रद्धा, धर्म, तंत्रमंत्राने युक्त प्राचीन भाषा पण त्यातही लोकसाहित्याचे काही अस्सल नमुने आहेत; आणि त्यात हास्यरस, विनोदाची पखरण आहे. अत्यंत मार्मिक, सहज, नैसर्गिक सहज जाता जाता टोपी उडवणारा हा विनोद मानवी स्वभावाच्या वैशिष्ट्यांवर आधारित, अतिशय वास्तव आहे. उपरोध, उपहास, उपलाम्भ (टोमणे) या सगळ्यांना वास्तवाचा पाया आहे. कधी अतिशयोक्ती आहे; पण अश्लीलता, पांचटपणा इथे नाहीत'. विनोदातही संस्कार आहेत, संयम आहे, निखळ, निर्भेळ विनोद मनोरंजन करतो. त्याचबरोबर आत्मपरीक्षणाला स्वत:ला ओळखायलाही मदत करतो. विनोद सूचक आहेत. कधी शब्दांवर आधारित तर कधी अर्थावर तर कधी चक्क व्याकरणावर आधारित. विनोद सात्विक, प्रसन्न करणारा आहे आणि स्मरणात कोरला जाणारा आहे, युगानुयुगे ऐकला, ऐकवला गेला तरी शिळा होत नाही. आश्चर्यचकित करणारा, बुद्धिमत्ता, चातुर्य, प्रसंगावधान व्यक्त करणारा प्रसन्न विनोद! कृत्रिमता, ओढाताण नाही. स्वरूप संवादात्मक आहे. किचकट क्लिष्ट नाही, कुणालाही कळावा आणि त्यातला आशय वळावा. त्यात ज्ञान आहे, व्यवहारज्ञान आहे, मनुष्य स्वभावाचे सूक्ष्म निरीक्षण, त्याच्या वागण्यातली विसंगती, विरोधाभास, दंभ, ढोंग, माणसाची स्वार्थी सुखासीन वृत्ती यांचे प्रतिबिंब पडले आहे, तो उत्स्फूर्त विनोद आहे.

संस्कृतमधला प्राचीन भारतीय हास्यरसमय विनोद हास्याचा गडगडाट, सातमजली हास्य निर्माण करणारा नाही. तो स्मितहास्य निर्माण करणारा खट्याळ, मिश्किल आहे. खिल्ली उडवणारा, 'फिरकी' घेणारा आहे, गुदगुल्या करणारा विनोद जीवनाला स्वाद देणारा आहे. नवरसातला हा विनोद इतर रसांना जोडून येतो, त्यांचे सौंदर्य वाढवतो. मनावरचा ताण कमी करतो. एखादे फूल फुलावे तसा फुलत जातो, कुणाला दुखवत नाही, टीका करत नाही. पण ज्याची त्याची जागा, ज्याला त्याला नीट दाखवून देतो. या विनोदात जातीयता नाही, विशिष्ट विषयांना लक्ष्य करणारा नाही. आजकाल स्त्रिया, राजकारण, नाटक सिनेमातले नटनट्या, त्यांचे खाजगी जीवन अगदी कमरेखालचे विनोद आढळतात. दुसऱ्यांचा विनोद स्वत:चा म्हणून खपवतात. पाश्चात्य विनोद, कोट्या यांचा प्रभाव दिसतो. विनोदाचा अतिरेक बाष्कळ, बालीश, पाचकळपणा असलेले द्वयर्थी शब्द वापरलेले विनोद दिसतात, त्यांना का हसावे असे वाटते, इतके 'हास्यास्पद' विनोद असतात. विनोदाची प्राचीन परंपरा लुप्त झाली आहे. तत्वज्ञानाची गंगा, संस्कृतीची यमुना आहे. विनोदांची सरस्वती मात्र शोधावी लागते. उत्कृष्ट दर्जाचे, घरंदाज विनोद एक बौद्धिक मेजवानीच आहेत. आजचे विनोद कित्येकदा दुखावणारे, दुरावणारे आहेत. निर्मळ माणसांना विनोद, हास्य दोन माणसांना जोडते, त्यांच्यातले अंतर कमी करते. एकत्र हसण्यात एक आगळा आनंद असतो. स्वत:लाच हसणे, त्याला फार मोठे, उदार मन लागते. आपल्या चुका, दोष स्वीकारायची तयारी



अनुक्रमणिका

लागते. विनोदाला त्याकाळीही प्रतिष्ठा होती.

संस्कृत, प्राचीन विनोदातून राजा, गुरू, विद्वानच काय पण अगदी देवही सुटलेले नाहीत. सर्वात जास्त विनोद कदाचित देवांवरही असावेत, पण तत्कालीन श्रद्धाळू, धर्मनिष्ठ समाजाने ते अतिशय खिलाडू वृत्तीने स्वीकारले. कुणाच्याही भावना दुखावल्या गेल्या नाहीत की; श्रद्धास्थानांना धक्का बसला नाही. शैव, वैष्णव व कुणीही नाराज झाले नाहीत. विनोदाकडे बघण्याचा दृष्टिकोन स्वच्छ होता, उदार होता. लक्ष्मी कमळात राहते, विष्णू समुद्रात, शिव हिमालयावर, का बरं, स्वर्गात का नाही? तर ढेकणांच्या भीतीने! जगात सर्वश्रेष्ठ निवासस्थान म्हणजे सासुरवाडी, जावयांनी तिथे राहावं, स्वर्गसुख मिळवावं म्हणून तर शिव त्यांचे सासरे हिमालयावर राहतात. विष्णू त्यांचे स्वशुर समुद्राकडे राहतात. देवांच्या विश्वातही 'एक नूर आदमी, दस नूर कपडा' आहे. विष्णूचा रेशमी पितांबर पाहून समुद्राने त्याला साक्षात कन्या लक्ष्मी दिली; तर शिवाचे दिगंबर रूप पाहून त्याला दिले हालाहल विष! शिवाचा प्रपंच जगावेगळा! पार्वती आणि जटेतल्या गंगेचे भांडण, गणपतीच्या उंदराला शिवाच्या गळ्यातला साप खाऊ पहातो, त्या सापाला कार्तिकेयाचा मोर खायला टपलेला, पार्वतीचा सिंह, शिवाच्या नंदीला खायला तयार! पार्वती अन्नपूर्णा आहे म्हणून बरे. नवऱ्याला पाच तोंडे, एका मुलाला सहा तोंडे, एका मुलाचे हत्तीचे तोंड. केवढा स्वयंपाक लागणार! शिवाच्या लग्नाची बैठक फार गमतीशीर. मुलाला वय, जन्मतारीख, जन्मवेळ, जन्मस्थान नाही, पत्रिका कशी करणार? आई-वडील, बहीण-भाऊ, नाती-गोती नाहीत, घरेदारे, शेतीवाडी नाही, उत्पन्नाचे साधन नाही. व्यवसाय भीक मागणे! चांगले कपडे नाहीत. भस्म, जटा, साप, गंगा, तिसरा डोळा असे चित्रविचित्र रूप! प्रेमाची चेष्टामस्करी तर फारच मजेदार. लक्ष्मी म्हणते- 'पार्वती तुझा नवरा काय तर पशुपती.' पार्वती म्हणते- 'तुझा नवरा, त्याने तर कृष्णावतारात गुरेच राखली ना?' लक्ष्मी म्हणते- 'तुझ्या नवऱ्याच्या गळ्यात काय तर साप?' पार्वती म्हणते- 'ते तरी परवडलं तुझा नवरा तर सापावर झोपतो.' इकडे गणपती कार्तिकेयाचे अंगभर असलेले डोळे मोजतो तर कार्तिकेय गणेशाचे मऊ, मोठे कान ओढतो, सोंडेची लांबी मोजतो'. सगळीच गंमत जंमत, मौजमजा. विष्णू 'लक्ष्मीवान' अतिश्रीमंत, त्याला इतरांच्या वेदना कशा कळणार? बिचारा शेष पृथ्वी धारण करतो ते ओझं कमी की काय, म्हणून विष्णूही त्याच्यावर झोपतात. शिव-पार्वतीची भांडणे अशी विनोदी, रंजक आहेत, अगदी आजच्या नवराबायकोंसारखीच.

विवाह हा विनोदाचा सनातन विषय आहे. कन्या रूप पाहते, माता संपत्ती पाहते, पिता शिक्षण पाहतो, नातलग घराणं पाहतात. बाकी सर्वांना रस असतो तो 'मिष्टान्नांमध्ये' केवढं सत्य आहे हे! आजही! उंटाच्या लग्नात, गाढवं मंत्र गातात, परस्पर प्रशंसा करतात. वा:! काय रूप आहे, वा: काय मधुर स्वर आहे! जावई दहावा ग्रह असतो. सदा क्रोधित, सदा मानी, पूजेची अपेक्षा करणारा, वक्रगतीचा! विजोड जोड्या जमवणाऱ्या ब्रह्मदेवालाही दोष दिला आहे. देवाला वाघाचा, सिंहाचा, हत्तीचा बळी लागत नाही. बोकडाचा लागतो, तोही दुबळ्यांचा घात करणारा आहे.

शिक्षकांविषयी कवी म्हणतात, शिकवण्याची तयारी संपली की 'शेषं कोपेन पूरयेत् ।' विद्यार्थ्यांवर चिडायचे, रागवायचे, वेळ मारून न्यायची! आख्यान किती चालणार, दिव्यात तेल असेपर्यंत. 'यावत् तैलं तावत् आख्यानम्'. संपत्तीचा महिमा 'सर्वे गुणाः काञ्चनम् आश्रयन्ति' मधे किती मार्मिक रीतीने व्यक्त झाला आहे. दरिद्री माणूस म्हणतो- 'अरे दारिद्र्या, तुझ्या कृपेने मी सिद्धपुरुष झालो आहे, मी सर्वांना पाहतो. मला कुणी पाहत नाही'. दारिद्र्य किती चांगले. दरिद्री माणसाला वणवण करण्याने व्यायाम होतो, मग भूक चांगली लागते, जे काही खाऊ ते चविष्ट



अनुक्रमणिका

वाटते, अंगी लागते, अपचन होत नाही म्हणूनही दारिद्र्याला धन्यवाद दिले आहेत. मृदुंगही 'धनम्' 'धनम्' असा आवाज करत असतो.

डॉक्टर हाही प्राचीन विनोदाचा विषय. वैद्यराज तुम्हाला नमस्कार असो, तुम्ही यमराजाचे सख्खे भाऊ आहात, यम फक्त प्राणच घेतो. तुम्ही प्राणही घेता; आणि धनही! एका गावात दोन वैद्य होते. दोघे भाऊही, एकदा दोघेही परगावी गेले, एक जरा लवकर परत आला. त्याने दुरून चिता जळताना पाहिली. तो मनात म्हणाला, "मीही गावात नव्हतो, माझा भाऊही. मग या जळणाऱ्याला मारलं तरी कुणी?' भोंदू वैद्याचे वर्णन केले. या त्या झाडाचे मूळ, यात त्यात मिसळून याला त्याला द्यावे म्हणजे हे तरी होईल किंवा ते तरी! ज्योतिषाला सांगितले आहे- 'तुम्ही दीर्घायुषी आहात', असे सांगा कुणालाही. जगला तर भविष्य खरे होते, मेला तर कुणी विचारायला येत नाही. थापाड्या ज्योतिषांची टिंगल केलेली दिसते. ब्राह्मण भोजनप्रिय असतात, शरीरावरून भोजनाची कल्पना येते ही गोष्ट सांगितली आहे. संस्कृत नाटकातला विदूषक हे विनोदी पात्र धांदरट, विसरभोळा, गडबडघोटाळे करणारा, भित्रा आणि कमालीचा खादाड! चंद्र त्याला मोठ्या लाडूप्रमाणे वाटतो. राजा प्रेमप्रकरणात मग्न, इथे हा भुकेने व्याकूळ. राजाला टोमणे मारण्यातही हुशार! प्रसिद्धी पाहिजे- मडकी तोडा, कपडे फाडा, गाढवाप्रमाणे ओरडा. 'येनकेनप्रकारेण' प्रसिद्ध पुरुष व्हा! असेही सांगितले आहे.

विनोदाचे हास्यमौक्तिक विखुरलेले आहेत. शंकराचार्यांनी वार्धक्याचे, त्यातल्या लालसेचे केलेले वर्णनही विनोदी आहे. अनेकदा ते प्रतिपक्षाला विनोदी प्रत्युत्तर देतात. गंभीर चर्चाही रंजक होते. ते नेहमी सांगत, जग माया आहे, भासमान आहे. एकदा एक माजलेला हत्ती रस्त्यावरून धावू लागला. लोक जीवाच्या भीतीने पळू लागले. शंकराचार्यही पळू लागले. एकजण खोचकपणे म्हणाला, 'अहो पळू नका. हा हत्ती माया आहे, खरा नाही.' शंकराचार्य म्हणाले, 'हा हत्ती जशी माया आहे, तसे माझे पळणेही माया आहे.'

प्राचीन भारतीय हास्यकणिका अशा आहेत वातावरण हलकफुलकं, ताजेतवाने करणाऱ्या! शिंपल्यातले मोती शोधायला मात्र हवेत.

शेवटी शिवपार्वतीच्या जोडीमधला हा विनोद. स्त्रियांना विनोदबुद्धी नसते हे म्हणणाऱ्यांना गप्प बसवणारा. आदिमाता पार्वतीची विनोदबुद्धी किती मार्मिक, उत्स्फूर्त आणि भाषेवरचे प्रभुत्व दाखवणारी आहे. एकदा शंकर द्यूत खेळून रात्री खूप उशीरा घरी आले. पार्वतीने ठरवले, त्यांना दारच उघडायचे नाही. शंकरांनी कुटीचा दरवाजा ठोठावला. पार्वती आतून म्हणाली, 'कोण आहे? ओळख सांगा तरच दार उघडणार, शंकर म्हणाले, 'प्रिये मी 'नीलकंठ' आहे' (कंठ निळा असलेला/मोर) मग पार्वती म्हणाली मोरासारखं ओरडून दाखव. मग ते म्हणाले मी 'शूली' आहे. (त्रिशूल धारण करणारा/पोटशूळ झालेला) पार्वती म्हणाली मग वैद्याकडे जा. मग ते म्हणाले मी 'स्थाणु' आहे. (जगाचा आधारस्तंभ/वृक्ष) पार्वती म्हणाली, वृक्ष तर बोलत नाहीत. तू वृक्ष कसा? मग ते म्हणाले- "अग मी शिवेचा जीवनाधार आहे. (पार्वती/कोल्ही) मग पार्वती काही कमी नाही. ती म्हणाली- "जंगलात कोल्ही वाट पाहत असेल तिकडे जा) असे म्हणून शिव पार्वती हास्यरसात मग्न झाले.

सुंदर संवादात्मक विनोदाचा, सोज्वळ नमुनाच हा म्हणता येईल. ज्यात काव्य, शास्त्र आणि विनोदही आहेत.

◇◇◇

**सौ. अनघा ठोंबरे**
१/१३ सहजानंद सोसा., कोथरुड, पुणे ३८
फोन : २५३८२६३३

# अक्षरमैत्री, मुक्तांगणची गोष्ट आणि सुनीताबाई या पुस्तकांविषयी

– प्रा. मिलिंद जोशी

**१) निखळ स्नेहबंधांची 'अक्षरमैत्री'**

रागिणी पुंडलिक या उत्तम लेखिका आहेत. मराठी साहित्यात आपल्या कर्तृत्वाची नाममुद्रा उमटविणाऱ्या विद्याधर पुंडलिकांच्याबरोबर संसार करत असताना उभयतांच्या साहित्य प्रेमामुळे त्यांचे अनेकांशी मैत्र जोडले गेले. साहित्याच्या माध्यमातून जोडल्या गेलेल्या निखळ स्नेहबंधांचे दर्शन 'अक्षरमैत्री'नी या त्यांच्या पुस्तकात आहे. पुंडलिक कुटुंबीयांच्या सहवासात आलेल्या पंचवीस साहित्यिकांची व्यक्तिचित्रे या पुस्तकात आहेत. कुसुमावती देशपांडे, शांता शेळके, कमलाताई पाध्ये, श्री.पु. भागवत, व्यंकटेश माडगूळकर, रवींद्र पिंगे, नानासाहेब गोरे, स.ह. देशपांडे, जयवंत दळवी, द.मा. मिरासदार, श्री.ग. माजगावकर, श्रीराम पुजारी, डॉ.व.दि. कुलकर्णी, रमेश तेंडुलकर, महादेवशास्त्री जोशी, प्रभाकर पाध्ये, शरदश्चंद्र चिरमुले या मान्यवरांचा अक्षरसहवास रागिणीताईंनी या पुस्तकात शब्दबद्ध केला आहे.

हा व्यक्तिचित्रणात्मक लेखसंग्रह आहे. या लेखकांच्या जडणघडणीविषयीही रागिणीताईंनी लिहिले आहे. त्यामुळे हा व्यक्तिचित्र-चरित्र संग्रह आहे. या सर्व लेखकांची जीवनाकडे आणि साहित्याकडे पाहाण्याची दृष्टी या लेखनातून पुढे आली आहे. हेच या पुस्तकाचे वेगळेपण आहे. या प्रतिभावंतांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक नवे पैलू रागिणीताईंनी उलगडून दाखवले आहेत.

शान्ता शेळके यांच्या घरी गेल्यानंतर एखादी पाल त्यांच्या मांडीवर गुरगुरत पडलेही असायची. त्यांना पालीची अजिबात भीती वाटायची नाही. त्यांना मांजरांचीदेखील आवड आणि एखादा 'मार्जारकोश' आपण तयार करू का? असं त्या पुंडलिकांना विचारत. मोठ्या लेखिका आणि प्राचार्य असणाऱ्या कुसुमावती देशपांडे झोपताना कवी अनिलांचे पाय चोळत! त्या साहित्यसंमेलनाच्या पहिल्या स्त्री अध्यक्षा होऊनही त्यांना कुठेही 'ग'ची बाधा नव्हती. असं निरीक्षण रागिणीताईंनी नोंदवलं आहे. पती आणि मुलाच्या निधनानंतर खचलेल्या कमलताई पाध्येंना रागिणीताई भेटायला गेल्या. क्रिकेटचा विषय निघाला. रागिणीताई म्हणाल्या, "आपला भारत क्रिकेटमध्ये नसला की, दोन परकीयांच्या मॅचेस पाहायला मज़ा येत नाही." त्यावर कमलाताई पाध्ये म्हणतात, "त्यातल्या एका देशाचं आपण प्रतिनिधित्व स्वीकारायचं मग मजा येते" अशा या कमलाताई कितीतरी वेळा या दुःखाच्या दिवसात भेटल्या की गुरुपद दाखवून घ्यायच्या.

एक चिरंतन संपादक हा श्री.पु. भागवत यांच्यावरील लेख अप्रतिम असाच आहे. 'अश्विन एक विलपिका' हे रागिणीताईंचे पुस्तक मौजेने प्रकाशित केले. श्रीपुंनी त्यांना चार वेळा या पुस्तकाचे पुनर्लेखन करायला लावले. या पुस्तकाचे पुनर्लेखन करणे म्हणजे स्वतःच्या मुलाच्या मृत्यूच्या कटू आठवणींना उजाळा देणेच होते. रागिणीताईंची समजूत काढताना श्री. पु. म्हणतात 'रागिणीताई, पुनर्लेखनामुळे लेखकाला सुबक आकार येतो. तुम्हाला त्रास होतोय याची मला जाणीव आहे. पण पुस्तकाचे मूल्य लेखकाच्या भावनेपेक्षा लेखनाच्या गुणधर्मावर ठरविले जाणार आहे." लेखनाविषयीचे

संपादक आणि प्रकाशक म्हणून श्रीपुंना वाटणारे गांभीर्य महत्त्वाचे आहे. पुंडलिकांच्या 'सती' या कथेवरून वादळ उठले. एकाने त्यांच्याविरुद्ध सोलापूरच्या कोर्टात केस दाखल केली. प्रत्येकवेळी श्री.पु. मुंबईहून येऊन सोलापूरला पुंडलिकांबरोबर जात. 'गुन्हेगार बसण्याची जागा' असा फलक लावलेल्या जागेवर कोर्टात बसलेल्या पुंडलिकांना पाहून श्रीपुंचे डोळे भरून येत. पुंडलिक आपल्या लेखनावर ठाम होते. त्यासाठी त्यांनी सर्व प्रकारचे कष्ट सोसले. लेखक तत्त्वनिष्ठ आणि ठाम असले की प्रकाशकही पाठीशी उभे राहात. अव्यभिचारी साहित्यनिष्ठा असलेली लेखकांची आणि प्रकाशकांची पिढी कशी होते याचेही दर्शन या पुस्तकातून घडते. श्रीपु आणि पुंडलिकांचा कोर्टातला ताण हलका व्हावा, यासाठी श्रीराम पुजारी सोलापूरमध्ये आवर्जून कोर्टात उपस्थित राहात. या साऱ्यांचे मैत्र कसे जीवाभावाचे होते याचेही दर्शन या पुस्तकात घडते.

परमानंदी रवींद्र पिंगे या शीर्षकाचा एक सुंदर लेख या पुस्तकात आहे. जयवंत दळवी आजारी असताना रवींद्र पिंगे त्यांच्याकडे गेले होते. दळवी त्यांना म्हणाले, "एका मृत्युलेखाचे तुम्हाला किती रुपये मिळतात?" पिंगे म्हणाले, "दीडशे रुपये." त्यावर जयवंत दळवींनी पाकिटातून तीनशे रुपये काढले आणि पिंग्यांसमोर धरत म्हणाले, "हे तीनशे घे, पण माझ्यावर मृत्युलेख लिहू नकोस." दळवींच्या बोलण्याचा पिंग्यांना राग आला नाही. एकदा ते पुंडलिकांना भेटायला आले. बाहेर येऊन खुर्चीवर बसत पुंडलिक म्हणाले, "पिंगे, मला अजून वर जायला अवकाश आहे." पिंगे खजिल झाले; पण त्यानंतरही ते पुंडलिकांकडे येत राहिले. रागालोभाच्या पलीकडे जाऊन मैत्र कसे जपता येते हे पिंग्यांनी दाखवून दिले. पुंडलिकांच्या शेवटच्या आजारात त्यांच्या नकळत टेबलावर असलेल्या पुस्तकात गुपचूप पैसे ठेवून जाणारे मनस्वी जयवंत दळवी या पुस्तकात भेटतात. आपला मुलगा सचिन तेंडुलकर प्रसिद्धीच्या झोतात असतानाही पुंडलिकांना त्यांच्या अकाली गेलेल्या मुलाची आठवण येऊ नये म्हणून सचिनचा विषय टाळणारे त्यांचे मन जपणारे रमेश तेंडुलकर कसे होते याचेही दर्शन रागिणीबाई घडवतात.

द.मा. मिरासदार कथाकथनात खूप वेळ घालवतात ही गोष्ट पुंडलिकांना खटकायची. त्यांच्या हातून लेखन होत नाही; याची त्यांना खंत होती. 'सत्यकथेत कथा का लिहीत नाहीस?' या पुंडलिकांच्या प्रश्नाला उत्तर देताना द.मा. म्हणतात, "कथाकथनातून सत्यकथेतल्या कथालेखनापेक्षा जास्त पैसे मिळतात." पैशापेक्षाही नवनिर्मितीचा आनंद महत्त्वाचा आहे असं सांगणाऱ्या पुंडलिकांना द.मा. म्हणतात, "मला जर कुणी सांगितलं हा दगडांचा ढीग आहे. दिवसभर हे दगड इकडून तिकडे टाकायचे आणि या कामाचे तुला पाच हजार देईन. तर ते काम कितीही कंटाळवाणं असलं तरी आणि त्यात तोचतोचपणा असला तरी मी पैशासाठी त्यात उत्साह आणून, लेखकाच्या नजरेतून बघून एखादी कथा-कल्पना त्यातूनही सुचेल म्हणून आनंदाने करीन. आपल्या लेखकांना त्यांच्या कामाच्या श्रमाच्या मानाने पैसा म्हणून दृष्टीस पडत नाही" अशी स्वच्छ आणि स्पष्ट भूमिका मांडणारे मिरासदार या अक्षरमैत्रीत भेटतात.

या पुस्तकात पुंडलिकांविषयीचा स्वतंत्र लेख नाही, पण मित्रांच्या सहवासातून पुंडलिकांचे जे व्यक्तिचित्र उभे राहाते ते जास्त भावणारे आहे. गुणग्राहकता हा रागिणीबाईंचा स्थायीभाव असल्यामुळे 'जे जे चांगले ते ते वेचियले ।' या भूमिकेतून त्यांनी ही व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत. या लेखनात कुठेही भाषेचे अवडंबर नाही. पांडित्याचा आव नाही. गप्पांच्या ओघात या माणसांविषयी त्या सांगत आहेत. इतक्या अकृत्रिमपणे त्यांनी ही व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत. हे सारे मोठे लोक माणूस म्हणून कसे होते, त्यांची

जीवनाकडे, साहित्याकडे पाहाण्याची दृष्टी कशी होती हे समजून घ्यायला हे पुस्तक निश्चितच उपयोगी ठरेल.

*('अक्षरमैत्री', रागिणी पुंडलिक, संस्कृती प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७६, किंमत १५० रु.)*

### २) अस्वस्थ करणारे समाजदर्शन

डॉ. अनिल अवचट हे एक हरहुन्नरी व्यक्तिमत्त्व आहे. ते डॉक्टर आहेत, लेखक आहेत, कवी आहेत, चित्रकार आहेत. ओरिगामी आणि लाकडातील शिल्प करायला त्यांना आवडते. ते बासरी वाजवतात. गाणी म्हणतात. त्यांना भ्रमंतीचे वेड आहे. या साऱ्या गोष्टी जपताना त्यांची सामाजिक जाणीव तीव्र असते. कार्यकर्ता म्हणून ते आपली भूमिका चोख बजावतात. व्यसनाधीन लोकांना व्यसनमुक्त करण्यासाठी 'मुक्तांगण व्यसनमुक्ती केंद्र' डॉ. सुनंदा अवचट यांनी केले. सुनंदाताईंच्या निधनानंतर या केंद्राचे काय होणार, असाही विचार डॉ. अनिल अवचट यांच्या मनात आला होता पण 'मुक्तांगण'चे कार्य हीच सुनंदाताईंना खरी आदरांजली असं मानत पूर्वी सुनंदाताईंच्या बरोबरीने कार्यरत असलेले अनिल अवचट सुनंदाताईंच्या निधनानंतरही तेवढ्याच उत्साहाने कार्यरत आहेत.

डॉक्टरांचे महाराष्ट्र टाईम्समधील लेख वाचून सुनीताबाईंचा फोन आला. पु.ल. आणि सुनिताबाईंनी या दोघांना भेटायला बोलावले. 'व्यसनाधीन मुलांसाठी काय करता येईल?' या विषयावरच्या चर्चेतून एक व्यसनमुक्ती केंद्र काढता येईल; अशी कल्पना डॉ. सुनंदा अवचट यांनी मांडली. या कार्यासाठी पु.ल. आणि सुनीताबाईंनी त्या काळात एक लाख रुपये दिले. २९ ऑगस्ट १९८६ ला 'मुक्तांगण'चे उद्घाटन झाले. डॉ.ह.वि. सरदेसाई, बाबा आमटे या कार्यक्रमाला उपस्थित होते. देणगी दिल्यानंतर पु.ल. मुक्तांगणच्या सुरुवातीच्या समारंभात म्हणाले होते, "या केंद्राची भरभराट होवो, अशी शुभेच्छा तरी कशी देऊ? अशा केंद्राची समाजाला आवश्यकताच वाटू नये, अशी केंद्रे लवकरात लवकर बंद पडोत, अशी इच्छा." एका जरी घरात व्यसनमुक्तीचा दिवा लागला, तर माझ्या देणगीचे सार्थक झाले असे मी मानेन. हे व्यसनमुक्ती केंद्र सुरू झाले. वेगवेगळ्या व्यसनांच्या अधीन गेलेले पेशंट येथे येऊ लागले. ते कशांमुळे व्यसनाधीन झाले. त्यांच्या व्यसनाधीन होण्यामुळे पत्नी, मुले, आई-वडील साऱ्यांची कशी ससेहोलपट झाली, याच्या असंख्य करुण कहाण्या या पुस्तकात आहेत. ही माणसे व्यसनमुक्त झाल्यानंतर त्यांच्या पुनर्वसनाचे प्रश्न, ती पुन्हा व्यसनांच्या सापळ्यात अडकावीत यासआठी कार्यरत असणाऱ्या व्यवस्था, समाजाचा या माणसांकडे पाहाण्याचा दृष्टिकोन आणि एका व्यसनामुळे त्या माणसाच्या आयुष्याची आणि त्याच्यावर अवलंबून असणाऱ्या माणसांची कशी परवड होते; याचे अस्वस्थ करणारे चित्रण अनिल अवचटांच्या या पुस्तकात आहे. पेशंट बरा करणे एवढेच ध्येय डोळ्यांसमोर न ठेवता त्या पेशंटमधला 'माणूस समजून घेऊन त्याला दिलासा देण्याची सुनंदाताईंची आणि अनिल अवचटांची जी वृत्ती आहे. तिला सलामच केला पाहिजे असे हे पुस्तक वाचल्यानंतर वाटते. ज्यांना कुटुंबात स्थान नाही, समाजात पत नाही, जी माणसे इतरांच्या धिक्काराचा विषय बनलेली आहेत अशी माणसे आपली मानून त्यांच्यासाठी काम करत राहाणे ही गोष्ट मुळातच अवघड. त्यात धीर खचणारे प्रसंग पुन्हा याच व्यसनाधीन माणसांकडून वाट्याला येणारे. या साऱ्या अंध:कारात प्रकाशाचे कवडसे कसे शोधता येतात. आम्ही कसे शोधत राहिलो या संदर्भात डॉक्टरांनी केलेले विवेचन सांगितलेल्या गोष्टी वाचल्यानंतर मन हेलावून जाते. 'व्यसनी माणसांवर' हा 'व्यसनी' एवढा एकच शिक्का मारून त्याला समाजकोशातून

बाद करणे योग्य नाही. असा संदेश ठामपणे डॉक्टर वाचकांपर्यंत पोहोचवतात. हेच या पुस्तकाचे खरे यश आहे. डॉक्टरांच्या लेखणीची ती ताकद आहे.

डॉक्टरांच्या या 'मुक्तांगणच्या गोष्टीत' त्यांना या व्यसनमुक्तीच्या प्रवासात चांगली माणसे भेटली. ढिम्म, जराही न हलणाऱ्या, संवेदनशीलता बोथट झालेल्या यंत्रणाही भेटल्या; आणि आश्चर्य वाटावी इतकी चपळ, कार्यतत्पर आणि मदत करू पाहाणारी सरकारी यंत्रणेमधली माणसेही भेटली. या साऱ्यांच्याही ओघाने आलेल्या गोष्टीही या पुस्तकात आहेत:

आजच्या दिखाऊपणाच्या युगात साजऱ्या करणाऱ्या साऱ्या संकल्पनाच बदलल्या आहेत. दु:ख झाले तरी ते साजरे करायचे. आनंद झाला तरी तो साजरा करायचा. कशाचा तरी आधार घेऊनच दारू पिणे. पाजणे हा शिष्टाचाराचा एक भाग बनलाय. मुक्तांगणमध्ये पूर्वी तीस लोक ॲडमिट करीत होते. आता दीडशे बाहेर पूर्वी एकच कौन्सेलिंग सेंटर होते. आता ते वीस. बायका व्यसनाच्या आहारी जात नाहीत अशी समजूत होती. आता त्यांच्यासाठी वेगळं केंद्र काढावं लागतंय. डॉ. अनिल अवचट म्हणतात, हा एखाद्या कंपनीच्या चढत्या आलेखासारखा अभिमानाने सांगायचा विषय नाही. पण प्रश्न वाढतोय. जास्त काम करावं लागणार हेही दिसतंय. डॉक्टरांनी 'मुक्तांगणची गोष्ट' सांगताना उपस्थित केलेले सारे प्रश्न वाचकांना अस्वस्थ करणारे आहेत.

"हे पुस्तक वाचून व्यसनाच्या अंधारात चाचपडणाऱ्या एका जरी व्यसनीला बाहेर यायचा प्रकाशाचा ठिपका दिसेल, तर सार्थक झाले असे मी समजेन. व्यसनी नवऱ्याच्या एका जरी पत्नीला पूर्वीच्या जखमा विसरून चांगले आणि आत्मविश्वासाने जगावेसे वाटले की, त्याहून अधिक काय हवे? एका जरी व्यसनी बापाच्या लहानग्या पोराच्या मनावरचे काळेकुट्ट मळभ दूर होऊन छानसे कोवळे उन्ह पसरेल आणि त्यात ते पोर मस्त, अनिर्बंध नाचेल. त्यापेक्षा अधिक काय मिळवायचे असते?" अशी भावना डॉक्टरांनी पुस्तकाच्या शेवटी व्यक्त केली आहे. ही केवळ मुक्तांगणची गोष्ट नाही. सुधारणावादी म्हणवून घेणाऱ्या आजच्या समाजाचीही आहे. अस्वस्थ करणारी आपल्याच समाजाची ही गोष्ट वाचक निश्चितच गांभीर्याने वाचतील.

*(मुक्तांगणची गोष्ट – अनिल अवचट, समकालीन प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७३, किंमत २०० रु.)*

**३) वाचकांना समृद्ध करणारी स्मरणयात्रा**

महाराष्ट्राचे लाडके व्यक्तिमत्त्व असलेल्या पु.ल. देशपांडे यांच्या पत्नी अशी सुनीताबाईंची सर्वसामान्य लोकांना ओळख असली तरी संवेदनशील आणि कर्तबगार लेखिका, भाषेच्या उत्तम जाणकार, कविताप्रेमी, शिस्तप्रेमी, व्यवहार आणि कर्तव्यदक्ष अशी सुनीताबाईंच्या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाची विविध रूपे होती. पतीच्या प्रतिभेच्या, प्रसिद्धीच्या मोठेपणाच्या तेजात त्यांनी स्वत:चे तेज लुप्त होऊ दिले नाही. हे त्यांचे वेगळेपण. अशा सुनीताबाईंच्या जीवनकार्याचा परिचय करून देणारे पुस्तक मंगला गोडबोले यांनी लिहिले आहे. 'आहे मनोहर तरी' हे आत्मपर पुस्तक सुनीताबाईंनी लिहिल्यानंतर त्यांच्याविषयी वेगळे काही सांगणारे पुस्तक लिहिणे हे मोठे आव्हान होते. ते आव्हान मंगला गोडबोले यांनी समर्थपणे पेलले आहे. पु.ल. आणि सुनीताबाईंविषयी सर्वसामान्य लोक आणि बुद्धिजीवी वर्गात आकर्षण आहे. त्यांच्या संदर्भातला प्रत्येक शब्द मोठ्या चिकित्सकपणे वाचला जातो. त्यामुळे सुनीताबाईंविषयी लिहिणे हे एक सांस्कृतिक जोखमीचे काम होते. ते मंगला गोडबोले यांनी यशस्वीपणे पार पाडले आहे. 'सुनीताबाई' हे त्यांचे पुस्तक म्हणजे वाचकांना समृद्ध करणारी स्मरणयात्रा आहे.

'असं जगणं, असं लिहिणं आणि असं वागणं' अशा तीन सविस्तर प्रकरणांतून मंगला गोडबोले

यांनी सुनीताबाईंच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू उलगडून दाखविले आहेत. खरं तर माणूस ज्या वातावरणात वाढतो त्या वातावरणाचा परिणाम त्याच्या व्यक्तिमत्त्वावरती होत असतो. रूढीप्रिय, कर्मठ वातावरणात वाढूनही त्या सुधारणावादी, पुरोगामी विचारांच्या बनल्या. त्यांचा शैक्षणिक प्रवास, पुलंबरोबरचा विवाह, सांस्कृतिक क्षेत्रात दोघांनी मिळून बजावलेली कामगिरी, पुलंच्या यशाचा आलेख चढता असतानाच्या काळात कधी पाठीशी तर अनेकदा पुढे राहून सुनीताबाईंनी दिलेले योगदान, त्यांचं सहजीवन आणि अखेरच्या श्वासापर्यंत सुनीताबाईंनी जपलेला तत्त्वनिष्ठतेचा पीळ ज्याचा अनेकांनी सोयिस्करपणे, शिष्टपणा, तरकटीपणा असाही अर्थ घेतला त्याविषयी मंगला गोडबोलेंनी अतिशय मार्मिकपणे लिहिले आहे.

'असं लिहिणं' या प्रकरणात मंगला गोडबोले यांनी सुनीताबाईंच्या लेखनप्रवासाविषयी नेमकेपणाने लिहिले आहे. सुनीताबाईंकडे लेखिका होण्याची कुवत होती. त्यांचे वाचन दांडगे होते. त्यांचे स्मरण चांगले होते. त्यांच्या भाषिक जाणिवा समृद्ध होत्या. चळवळीतल्या सहभागांमुळे त्यांना समाजदर्शन घडले होते. या साऱ्या गोष्टी स्वत:कडे असूनही त्यांच्याकडे महत्त्वाकांक्षा नव्हती. सुनीताबाईंनी मोजके लिहिले. त्या लेखनातूनही त्यांनी स्वत:चा वेगळा ठसा उमटविला. सुनीताबाईंनी जीएंना आणि इतर मान्यवरांना लिहिलेली पत्रे, आहे मनोहर तरी, सोयरे सकळ, मण्यांची माळ या त्यांच्या पुस्तकप्रवासाविषयी कितीतरी नवे संदर्भ, नव्या गोष्टी, समजतात. त्यामुळे लेखनाकडे गंभीरतापूर्वक पाहाण्याची सुनीताबाईंची दृष्टी कशी होती; याचेही दर्शन मंगला गोडबोले घडवितात.

'असं वागणं' हे प्रकरण म्हणजे या पुस्तकाचा कळस आहे. मंगला गोडबोले म्हणतात त्याप्रमाणे सुनीताबाईंच्या दोन प्रतिमा समाजमनावर बिंबलेल्या दिसतात. एक प्रतिमा आहे– रसिक-काव्यलुप्त-कर्तव्यतत्पर कुटुंबीयांची. दुसरी प्रतिमा आहे– आग्रही, तत्त्वनिष्ठ, कर्तव्यकठोर व्यवस्थापिकेची. सुनीताबाईंमधलं वात्सल्य, कळवळा, वेदनेबद्दलची सहानुभूती, नव्या गोष्टींविषयी त्यांच्या मनात असणारी जिज्ञासा, कुतूहल, तज्ज्ञांकडून त्या जाणून घेण्याची त्यांची तत्परता, त्यांच्या स्वयंपाकघरातल्या पदार्थ बनविण्याच्या त्यांनी तयार केलेल्या स्वतंत्र पद्धती. त्यांचा नीटनेटकेपणा, काटकसरी वृत्ती, वेळेबाबतचा काटेकोरपणा, न्याय-अन्यायाच्या त्यांच्या जाणिवा, आर्थिक व्यवहाराबाबतची दक्षता, कायद्याचे ज्ञान, एकूण व्यवहारातला परखडपणा आणि पारदर्शकता, स्पष्टतोड वृत्ती याविषयी सुनीताबाईंच्या सहवासात आलेल्या व्यक्तींना भेटून मंगलाताईंनी त्या प्रसंगांच्या नोंदी देत सुनीताबाईंचे जे व्यक्तिचित्र उभे केले आहे ते अप्रतिम असेच आहे. सुनीताबाईंनी अतिचिकित्सा करून काही चांगल्या कल्पना उधळून लावल्या किंवा त्या मांडणाऱ्यांची चिकाटी पणाला लावून शेवटी त्या बारगळू दिल्या; अशा काही घटनांची नोंदही मंगला गोडबोले यांनी केली आहे. त्यामुळेच समग्रपणे वाचकांसमोर सुनीताबाई उभ्या राहातात. पुस्तकात समाविष्ट केलेल्या अनेक दुर्मिळ छायाचित्रांमुळे हे पुस्तक देखणे झाले आहे.

'ऐसे कठीण कोवळेपण' हा या पुस्तकात समाविष्ट केलेला डॉ. अरुणा ढेरे यांचा प्रदीर्घ लेख या पुस्तकाच्या मौलिकतेत भर घालणाराच आहे. व्यक्तिगत संबंधांच्या पार्श्वभूमीवरून सुनीताबाईंच्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वाचा त्यांनी नेमकेपणाने शोध घेतला आहे. 'अमृतसिद्धी : पुल समग्रदर्शन' या ग्रंथाचे काम डॉ. स.ह. देशपांडेंबरोबर मंगला गोडबोले यांनी परिश्रमपूर्वक केले. 'सुनीताबाई' हे पुस्तक लिहून त्यांनी केलेली वाङ्मयीन कामगिरी जशी महत्त्वाची आहे.

*(सुनीताबाई-मंगला गोडबोले, राजहंस प्रकाशन, पृष्ठे १९८, किंमत २५० रु.).*

◇◇◇

परिषदेकडे आलेल्या ग्रंथातील काहींचा थोडक्यात परिचय

# निवडक नवे

– उद्धव कानडे

## भवताल

मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस या प्रकाशनाच्या वतीने नुकतंच प्रकाशित झालेलं लेखिका नीलिमा बोरवणकर यांचं ललितबंधांचा संग्रह असलेलं हे नवं कोरं पुस्तक अतिशय वाचनीय झालेलं आहे. आजच्या बदलत्या सामाजिक जीवनात माणसाच्या मनाची होणारी प्रचंड ओढाताण अतिशय सूक्ष्मपणे लेखिकेने वाचकांसमोर ताकदीने मांडली आहे. जीवनाच्या प्रत्येक वाटेवर प्रवास करताना आपल्या अवतीभवती बरंच काही घडत असतं. वरवर पाहायला गेलं तर ज्या गोष्टी साध्या-साध्या वाटतात त्या घटनांचा, प्रसंगांचा अंतरंगात खोलवर जाऊन शोध घेतला तर काहीतरी वेगळंच सत्य हाती लागतं. जगण्यातल्या या आगळ्यावेगळ्या शोधातून ११ लेखांच्या 'भवताल'ची निर्मिती झालेली आहे.

अनवट वळणावरती, विळखा, एका सोबतीची गोष्ट, ती होती म्हणून, क्षणिक आणि क्षणातीत सुरांच्या पलीकडले, समसमा संयोग या लेखांच्या वाचनाने वाचक अस्वस्थ होतात. आजचे प्रश्न, आजचं जगणं कशी दिशा बदलतंय हे वाचकांना पटवून देतात. विकार हा शब्द उच्चारला की काम, क्रोध, मोह, माया हे आठवतात. प्रत्येक माणसाच्या ठायी हे विकार असतातच. पण जीवन जगताना विचारांच्या आधारे या विकारांच्या छटा बदलत जातात. मनुष्यस्वभावाची असंख्य रूप नजरेसमोर येतात.




*लेखिका :* नीलिमा बोरवणकर
*प्रकाशक :* मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस ठाणे (प.)
*पृष्ठे :* १८०
*मूल्य :* २०० रु.

## ज्वालेचे फूल

**।। शरदचंद्र मुक्तिबोध : व्यक्ती आणि वाङ्मय ।।**

डॉ. रणधीर शिंदे कोल्हापूर येथे शिवाजी विद्यापीठाच्या मराठी विभागात प्राध्यापक आहेत. यापूर्वी त्यांनी केलेले लेखनही महत्त्वाचे आहे. अण्णाभाऊ साठे साहित्य समीक्षा निवडक राजन गवस या ग्रंथांचे संपादन केले आहे. शरदचंद्र मुक्तिबोध समजून घेताना... या ग्रंथाला लाभलेली दिगंबर पाध्ये यांची प्रस्तावना या ग्रंथाच्या उपयुक्ततेचे आणि शरदचंद्र मुक्तिबोध यांच्या वाङ्मयाचे आणि जीवनदृष्टीचे वेगळेपणा व महत्त्व वाचकांच्या समोर घेऊन येते. मार्क्सवादी विचारसरणीचे लेखक म्हणून त्यांची ओळख आहे. व्यक्तिमत्त्वाची जडणघडण व जीवितकार्य, मुक्तिबोधांची कविता, मुक्तिबोधांची कादंबरी, मुक्तिबोधांचे समीक्षालेखन, त्यांचे इतर लेखन, मुक्तिबोधांचे साहित्य अशा प्रकरणातून डॉ. रणधीर शिंदे यांनी केलेली मांडणी आणि



सर्वज्ञात नसलेली माहिती या ग्रंथातून वाचकांसमोर आली आहे. मार्क्सवादी विचारधारा म्हणजे केवळ वर्गसंघर्ष आणि क्रांतीच्या घोषणा नाहीत. त्यामागे माणूस व मानवी समाज याविषयीची एक तत्त्वज्ञानविषयक भूमिका आहे. कष्टकऱ्यांच्या मुक्तीबरोबरच मानवमुक्तीचा विचार मांडणारी ही विचारधारा आहे. शरदचंद्र मुक्तिबोधांच्या समग्र लेखननिर्मितीची आणि चारित्राची मांडणी या ग्रंथात प्रभावीपणे केलेली आहे.

*लेखक :* डॉ. रणधीर शिंदे
*प्रकाशक :* लोकवाङ्मय गृह मुंबई
*पृष्ठे :* १७८, *मूल्य :* २०० रु.

### फिडेल कॅस्ट्रो

अतुल कहाते यांच्या अथक परिश्रमातून, चिकाटीतून आणि अभ्यासातून क्युबा देशाचा सर्वेसर्वा असलेला 'फिडेल कॅस्ट्रो'चं चरित्र वाचकांसमोर आलं आहे. क्युबाच्या स्वातंत्र्यासाठी आणि लोकशाही प्रस्थापनेसाठी अमेरिकेच्या जुलूमशाहीविरुद्ध लढणारा हा सेनानी. खरं तर त्याचं आयुष्य म्हणजे एक अभूतपूर्व वादळ आहे. 'फिडेल कॅस्ट्रो' हा विसाव्या आणि एकविसाव्या शतकातील सगळ्यात अद्‌भुत माणसांपैकी एक माणूस आहे. सगळ्या जगानं घाबरून जाऊन अमेरिकेपुढे नांगी टाकलेली असताना कॅस्ट्रोनं अपूर्व धैर्य दाखवून एकट्याच्या हिमतीवर सहा दशकांहून अधिक काळ अमेरिकेशी झगडा करायची यशस्वी कमाल करून दाखवली. आपल्या हिमतीवर कॅस्ट्रोनं अमेरिकेच्या तोंडचं पाणी पळवलं. वाचकांना अवाक् करून सोडणारा कॅस्ट्रोचा जीवनप्रवास अतुल कहाते यांनी तेवढ्याच समर्थ शैलीत या ग्रंथात मांडला आहे. कॅस्ट्रोचं आयुष्य म्हणजे रचलेली कहाणी नाही, तर ते जिवंत वास्तव आहे. कॅस्ट्रोच्या थक्क करून सोडणाऱ्या आयुष्याची ही अतिशय प्रभावीपणे मांडलेली चरित्रकथा मराठी वाचकांना अस्वस्थ केल्याशिवाय राहाणार नाही.




*लेखक :* अतुल कहाते
*प्रकाशक :* साकेत प्रकाशन प्रा. लि., औरंगाबाद
*पृष्ठे :* १९२
*मूल्य :* २०० रु.

### रेलचक्र

रेल्वेखात्यात व्यंकटेश देसाई या नावानं नोकरी करणारे सांगली जिल्ह्यातील बोर्गी या गावचे हे लेखक. लेखन मात्र व्यंकटेश बोर्गीकर या नावानं करतात. प्रदीर्घ काळ मध्यरेल्वेत नोकरी करताना आलेले अनुभव आणि घडलेल्या घटना, प्रसंग, गमतीजमती अतिशय मार्मिकपणे या पुस्तकात मांडल्या आहेत. 'मॅजेस्टिक'चे प्रकाशक अशोक कोठावळे यांनी हे 'रेलचक्र' देखण्या, स्वरूपात रसिकांसमोर ठेवले आहे. श्री. बोर्गीकर यांनी 'रेलचक्र' तीन भागात मांडले आहे. पहिल्या भागात धुरांच्या रेषा..., रेल्वेचं जाळं, कार्यप्रणाली, सिग्नल कंट्रोलर, रूळ ओलांडताना वगैरे विषय तर दुसऱ्या भागांत बुटाची चोरी, टी.सी.ची नेमणूक, फुकटे प्रवासी, अनाऊन्सर, रेल्वेचा पास, लाल डगलेवाला इत्यादी. तिसऱ्या भागात भारतीय मेट्रो रेल्वे, उपनगरीय रेल्वे, कोकण रेल्वे, रेल्वेची परंपरा, सामाजिक बांधीलकी, कामगार चळवळ, अर्थसंकल्प, रेल्वेमंत्री, रेल्वेतील रत्ने, सेवानिवृत्ती अशा अंगाने खुमासदार शैलीत या ग्रंथाची रचना



केली आहे. हा ग्रंथ वाचताना माहितीचा ठेवाच वाचकांसमोर उभा राहातो.

*लेखक :* व्यंकटेश बोर्गीकर

*प्रकाशक :* मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस, ठाणे (प.)

*पृष्ठे :* २१६

*मूल्य :* २४० रु.

**गुलाबी सीर – 'द पिंक हेडेड डक'**

श्री. शिंत्रे यांनी अनुभवलेल्या आणि त्यांना जाणवलेल्या सामाजिक बदलांची गडद छाया घेऊन आलेल्या या संग्रहातील कथा वाचनीय झाल्या आहेत. माणसांच्या व्यक्तिगत आणि सामूहिक वर्तनातले बदल लेखक आपल्या निरीक्षणशक्तीतून शब्दांमध्ये मांडतो आहे. माध्यमांमध्ये आणि समकालीन साहित्यात न उमटलेले विषय लेखकाने कथेसाठी निवडले आहेत. डॉट कॉम.डॉट ऑर्ग, एम्पथी, यिन, थँग आणि साताळकर, हस्तरेषांच्या ललाटरेषा, मारिय उद्यापासून सुरुवात आणि साक्षात्कार या कथांवरून स्पष्ट होते. विज्ञानयुगात काही चांगल्या गोष्टीही घडत असतात. त्या पाहून लेखक आशावादी बनतो.

लेखक संतोष प्र. शिंत्रे यांच्या या कथा नव्या शतकाच्या पहिल्या अकरा वर्षांमध्ये लिहिलेल्या आहेत. माणसाचं व्यक्तिगत आणि सामूहिक अस्तित्व कधी उजळून निघतं; तर कधी झाकोळून जातं. वर्तमान जगण्याला चक्रावून टाकणारी सामाजिक मानसिकता, माध्यमं, तंत्रज्ञान यामुळे मूल्य संस्कृतीपुढं उभं ठाकलेलं आव्हान पेलण्यात लेखक यशस्वी झालेला आहे. निसर्गाच्या सतत-होणाऱ्या ऱ्हासाची जाणीव लेखकाच्या चिंतनाचा विषय आहे. 'गुलाबी सीर – द पिंक हेडेड डक'मधील कथा म्हणजे अपेक्षाभंग आणि भ्रमनिरास या चक्रातून बाहेर पडण्याची नवी आशा वाचकाला देतात. आजच्या बदललेल्या विज्ञान वास्तवाला समजून घेताना मानवी जगण्याच्या कक्षा रुंदावण्याचा एका ताज्या दमाने लेखकाने केलेला प्रयत्न मराठी वाचकांना आवडणारच आहे.

*लेखक :* संतोष प्र. शिंत्रे

*प्रकाशक :* मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस, ठाणे

*पृष्ठे :* १४२

*मूल्य :* १७० रु.

**उंच उंच झोका**

स्त्री-शक्तीने जो एक अद्‌भुत आणि थरारक असा चमत्कार घडून आणला. तो वाचकांपर्यंत पोहोचवावा यासाठीच लेखिकेने 'उंच उंच झोका'मधील लेखन केले आहे. जिद्द, चिकाटी व अथक परिश्रम या गुणांमुळे माणूस काय करू शकतो याचं एक आदर्श उदाहरण विलेपार्लेच्या महिला संघाने घालून दिले. कष्टाने मिळवलेल्या जमिनीवर महिलांनी १६ कोटी रुपयांची देखणी वास्तू उभी केली. कामकरी मुंग्या आणि मधमाश्यांचा आदर्श बाळगत संस्थेच्या महिलांनी केलेले काम महत्त्वाचे, मोलाचे ठरले आहे. या गोष्टीला अनेक पदर आहेत. वेगवेगळे रंग आहेत. तशा विविक्ष क्षेत्रांतल्या महिला आहेत. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीला सामोरे जात काही सामान्य महिला पराकोटीचं मनोधैर्य दाखवत लढल्या आणि शेवटी जिंकल्या. शोभा बेंद्रे यांनी 'उंच उंच झोका' मधून हा लढा समर्थपणे मांडला आहे. या समर्पक लढ्याच्या शिल्पकार अनिता भागवत, मोहिनी कामत, शुभदा कुलकर्णी, संगीता इनामदार, लीना तांबवेकर, सुनीता जोशी, स्नेहप्रभा पारगांवकर, रेखा केंकरे, दिपाली कुलकर्णी, सुनिता गद्रे आणि शोभना नाटेकर या



कर्तृत्ववान्, असामान्य महिला आहेत. या कथेच्या असामान्य नायिका वाचकांना निश्चित भावतील.

*लेखिका :* शोभा ब्रोंद्रे

*प्रकाशन :* रोहन प्रकाशन, पुणे.

*पृष्ठे :* १५२

*मूल्य :* १५० रु.

**व्योमकेश बक्षी (रहस्यकथा)**

ज्येष्ठ पत्रकार अशोक जैन यांनी शरदिन्दू बंद्योपाध्याय यांच्या गाजलेल्या व बंगाली साहित्यात लोकप्रिय झालेल्या रहस्यकथांचा अनुवाद म्हणजेच 'व्योमकेश बक्षी' रहस्यकथासंग्रह प्रथमच मराठीत येत आहे. या संग्रहात 'मृत्युपत्रानेच घेतला बळी' या कथेसह 'काटेरी रहस्य, टॅरेंटुलाचे विष, जीवघेणी ज्वाळा' या कथांचा समावेश आहे.




यापूर्वी श्रीजाता गुहा यांनी याच कथा इंग्रजीत अनुवादित केल्या आहेत. या ग्रंथातील सगळ्याच रहस्यकथा वाचकांची उत्कंठा वाढवणाऱ्या आणि वाचकाला कथेत खिळवून ठेवणाऱ्या आहेत. शरदिन्दू बंद्योपाध्याय यांच्या या मूळकथा जरी १९३२ ते १९६७ या कालखंडात प्रकाशित झालेल्या असल्या, तरी या कथांचा टवटवीतपणा आणि ताजेपणा आज किंचितही कमी झालेला नाही. कथेचा नायक व्योमकेश बक्षी स्वत:ला गुप्तहेर म्हणवून घेत नाही, तर तो स्वत:ला सत्यान्वेषी असं म्हणवून घेतो. याचं महत्त्वाचं कारण त्याच्यांकडील प्रत्येक रहस्यमय प्रकरणातील अंतिम सत्याचा शोध घेण्यात तो पूर्ण यशस्वी होतो. रहस्याचा तर्कसंगत उलगडा करताना कथेत येणारे रहस्य वाचून वाचकाला थक्क व्हायला होतं. या कथा वाचताना शेरलॉक होम्सची आठवण झाल्यावाचून राहात नाही. याचं सारं श्रेय उत्तम शैलीत अनुवाद करणारे पत्रकार अशोक जैन यांना द्यावेच लागेल.

*मूळ लेखक :* शरदिन्दू बंद्योपाध्याय,

*अनुवाद :* अशोक जैन

*प्रकाशक :* रोहन प्रकाशन, पुणे.

*पृष्ठे :* १७५

*मूल्य :* १४० रु.

**साहित्यश्रेष्ठ ग.ल. ठोकळ**

प्राचार्य राम शिंदे यांच्या लेखणीतून साकारलेलं 'साहित्यश्रेष्ठ ग.ल. ठोकळ' हे पुस्तक पुण्याच्या स्नेहवर्धन प्रकाशनाने नुकतेच प्रकाशित केले आहे. या पुस्तकात ज्येष्ठ साहित्यिक ग.ल. ठोकळ यांच्या वाङ्मयीन आणि कौटुंबिक जीवनाचा प्रवास १२ भागांत वाचकांसमोर ठेवला आहे. ज्येष्ठ साहित्यिक डॉ. आनंद यादव यांनी या पुस्तकाला समर्पक अशी प्रस्तावना दिली आहे. साहित्यश्रेष्ठ ग.ल. ठोकळ यांच्या जीवनातील अनेक महत्त्वाच्या घटना, प्रसंग आणि अनुभव लेखकाने या पुस्तकात मांडले आहेत. त्यात ग.ल. ठोकळांचा जीवनवृत्तान्त, त्यांचा जीवनप्रवास, वैवाहिक जीवनाचा शुभारंभ, सुखी कौटुंबिक जीवन, त्यांची साहित्यिक वाटचाल, लघुकथालेखन. अशा विविध पैलूंमधून साहित्यश्रेष्ठ ग.ल. ठोकळ यांचं कार्य वाचकांसमोर मांडलं आहे.




साहित्यश्रेष्ठ ग.ल. ठोकळ यांच्या जन्मशताब्दीनिमित्त लेखक आणि ठोकळांचे जावई प्राचार्य राम शिंदे यांनी ग.ल. ठोकळांच्या बालपणीच्या अनेक आठवणी संक्षिप्तपणे सांगितल्या असल्या,

तरी त्यातून ठोकळांचं परिपूर्ण जीवनदर्शन वाचकांना झाल्याशिवाय राहात नाही. पुस्तक छोटे असले तरी ग.ल. ठोकळांच्या आठवणींना योग्य न्याय देणारे आहे.

*लेखक :* प्राचार्य राम शिंदे

*प्रकाशक :* स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.

*पृष्ठे :* ७२

*मूल्य :* ८० रु.

## सूर्यफूल

चंद्रपूरचे कवी अंकुश वाघमारे यांचा 'सूर्यफूल' हा कवितासंग्रह चंद्रपूरच्या हरीवंश प्रकाशनाने नुकताच प्रकाशित केला आहे. गेली २५ वर्षे ते ऊन-सावलीचा खेळ अनुभवीत आहेत. त्यांच्या कल्पनेतून आविष्कारलेले शब्द मानवी मनाचे आणि सामाजिक जाणिवांचे प्रतिबिंब आहे. मदन धनकर यांनी या संग्रहाला लिहिलेली प्रस्तावना वाघमारे यांच्या वाङ्मयीन जीवनाची ओळख करून देणारी आहे. हिंगणघाटानजीक व--- नदीच्या काठावर श्री. वाघमारे यांचं कवीमन बहरत गेलं. ज्ञानेश्वर, तुकारामांच्या आणि तुकडोजी महाराज यांच्या विचारांचे संस्कार त्यांच्यावर झालेले आहेत. पत्रकार या नात्याने काम करताना अंकुश वाघमारे यांनी जवळून पाहिलेलं ग्रामीण जीवन आणि ग्रामीण जीवनातील साध्या-भोळ्या माणसाच्या अंत:करणातला ओलावा त्यांनी शब्दांत मांडलेला आहे. एकूण ६० कवितांचा हा संग्रह कवीच्या संवेदनाशील मनाची साक्ष देतो. भूतकाळात डोकावतानाच वर्तमानाची चिकित्सा करीत भविष्याचा वेध घेणारी आणि कवीचे अनुभवविश्व प्रकट करणारी ही रूपकात्मक कविता म्हणूनच महत्त्वाची वाटते.




ग्रामीण भागात जन्म घेऊनही कवीने आपल्या जीवनाचा मार्ग स्वत:च शोधला आहे. ग्रामीण जीवनातील वास्तव आणि निर्मळसंस्कार संपन्नता यांनी 'सूर्यफूल' हा कवितासंग्रह बहरलेला आहे.

*कवी :* अंकुश वाघमारे

*प्रकाशक :* हरिवंश प्रकाशन, चंद्रपूर.

*पृष्ठे :* ८८

*मूल्य :* ८० रु.

## काही मनातलं




डॉ. सरिता कोठाडीया यांच्या कवितासंग्रहाचं 'काही मनातलं' हे शीर्षक; एक स्त्री, एक पत्नी, एक आई, एक सासू, एक डॉक्टर, एक मैत्रीण आणि एक माणूस म्हणून जगताना कवयित्रीच्या संवेदनाशील मनानं टिपलेलं हे भावविश्व आहे. कविता संस्कारमूल्य, ज्ञानमूल्य आणि भक्तिमूल्य जागवणाऱ्या आहेत. साहित्यिक सौ. स्नेहाताई शिनखेडे यांनी या संग्रहासाठी लिहिलेली प्रस्तावना बोलकी आहे. स्त्री म्हणून विविध भूमिका जगताना स्त्रीचे सनातन दु:ख सांगणारी ही कविता कवयित्रीच्या मनातील घुसमट वाचकांसमोर समर्थपणे मांडते.

*कवयित्री :* डॉ. सरिता कोठाडिया

*प्रकाशक :* डॉ. नलीन कोठाडिया, सोलापूर.

*पृष्ठे :* ६८

*मूल्य :* ५० रु.

◇◇◇

**उद्धव कानडे**
६८६/२अ+२ब, ब्लॉक नं. १५,
ज्ञानगंगा, गृहरचना संस्था मर्या. बिबवेवाडी,
पुणे - ४११०३७, मो. ९८९०६५२७२३.

# मराठी असे आमुचि मायबोली

– प्रा. वाग्वैद्य मो. गो. धडफळे

*[संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश इ. भाषांचे संस्कार घेत-घेत महाराष्ट्री भाषा साकारली. पुढे तिने उर्दू-फारसीचे संस्कार आत्मसात केले आणि अखेर इंग्रजीच्या प्रभावानेही ती वृद्धिंगत झाली. संपली नाही! मराठी ज्ञानभाषा म्हणून कमी पडत आहे; म्हणून इंग्रजी माध्यमातूनच शिक्षण झाले पाहिजे असा एक समाज-गंड (मास-मॅनिया) निर्माण झाला आहे. अव्वल इंग्रजी दर्जाच्या काळातही असा मनोगंड नव्हता. इंग्रजी भाषा आणि साहित्य पचवून मराठी भाषा आणि साहित्य समृद्धच झाले. मराठी भाषा बोलतच राहिली. प्रा. धडफळे यांचे याविषयीचे चिंतन हलक्या-फुलक्या भाषेत असले; तरी चिंतनीय आहे. मराठी कुठेही कमी पडणार नाही. मात्र ती बोलली पाहिजे; संधी मिळेल तिथे! –संपादक]*

सध्या मराठीचे अभ्यासक व अभिमानी यांच्यात एक विषय मोठ्या आस्थेने चर्चिला जात आहे व तो म्हणजे "मराठीचे भवितव्य." संस्कृत, आंग्ल व इतर पाश्चात्य भाषांकडील मराठी-जनांचा ओढा पाहता आपली माय-मराठी भावी काळात पुढच्या पिढीमध्ये शिल्लक राहील का नाही याची धास्ती मनात आहे.

इंग्रजी ही 'बहुतांशी' (पूर्णज्ञानी नाही) जागतिक 'माध्यम भाषा' ठरत असल्याने आपल्या पाल्यांच्या भवितव्यासाठी मराठी पालक वर्ग आंग्ल माध्यमांच्या शाळांची पाल्यांसाठी साहजिकच निवड करीत आहेत. ठीक आहे. परिणाम काय?

मराठी मुले-मुली फर्डे इंग्लीश बोलतात. हिंदी, मराठी सिनेमे व नाटके यांना 'यू-टर्न', ज्वेल थीफ, डॉन, बर्निंग ट्रेन यासारखी आंग्ल नावे वापरली जातात; आणि महाराष्ट्रीय बालिका आईला म्हणते "मॉम, शेजारची विजू अगदी 'हडळ' दिसते आहे ना?" "हडळ नाही, बेबी, हडकुळी" इति मॉम.

"डॅड, मी माझ्या 'बाळंतपणाच्या' गोष्टी लिहून ठेवू का?" इति सुपुत्र. "बाळंतपणाच्या नाही, 'सनी', तू तर 'बॉय आहेस; बालपणाच्या" इति 'डॅडी!

रामा, रामा! काय मराठीची स्थिती!

माझे याबाबतचे मत सरळ सांगून (टाकून) मोकळे व्हायचे तर 'जोपर्यंत उत्कृष्ट-साहित्य निर्मिती मराठीत होत आहे; तोपर्यंत मराठीचे अस्तित्व निश्चितच टिकून राहील. एवढेच नाही तर ते जोमाने वाढेल/ फोफावेल.'

शेक्सपिअरची एलिझाबेथकालीन आंग्ल नाटके 'झुंझारराव' (ऑथेल्लो), चन्द्रसेन (हॅम्लेट), पुलंचं "ती फुलराणी" (माय फेअर लेडी), 'एका कोळियाने', आंग्ल-रोमॅन्टिक कवि वर्डस्वर्थ, शेले बायरन् यांचा जो खोल ठसा मराठी कवींवर पडला आहे तो गोविन्दाग्रज म्हणतात "अवतरूनि फिरूनि शेले केशवसुत गाऊन गेले."

मराठीची शत्रू संस्कृत तर नक्की नाही. उलट किर्लोस्करांचे 'शाकुन्तल', देवल यांचे 'मृच्छकटिक', अशा नाटकांनी मराठीची रंगत वाढली आहे. क्वचित् मुळापेक्षा बहारीची 'वेड्या मना तळमळसी', 'रजनीनाथ हा नभी उगवला' अशी पदे मराठीचा अभिमान आहेत. आंग्ल कादंबऱ्या 'Vicar of Wakefield' (वाईकर भटजी), पळवलेला पोर (Kidnapped वि. कृ. श्रोत्रिय), "गुप्त खजिना" (Treasure Iland चे मराठीतील वाघोलीकरांचे भाषांतर) यामुळे मराठी साहित्य समृद्ध झाले आहे.

जर्मन (काफ्का) निसर्गाचे फ्रेंच याशातश्याने वर्णन फ्रेंच अस्तित्ववादामुळे मराठी साहित्याला नवे पैलू प्राप्त झाले आहेत. यासाठी आंग्ल, शार्मण्य,

फ्रेंच या भाषा यायला हव्यात.

मराठी मुले इंग्रजीत शिकली म्हणून काय झाले? माझ्या एक विद्यार्थीनी आहेत. त्या मूळच्या केरळी. नाव वीणा राज. मोठ्या आयकर अधिकारी आहेत. त्यांच्या घरात मराठी, इंग्रजी, हिंदी व मल्याळम् अशा चार भाषा बोलल्या जातात. मराठी-जनांना बहुभाषिक (Poly-glott) व्हायला काय हरकत आहे.

मी आयुष्यभर संस्कृतचा अभ्यास केला. मला जर कोणी विचारले की संस्कृतच्या व्याकरणासाठी काय वाचू? तर मी 'अष्टाध्यायी' सांगणार नाही. पाणिनीचा वापर म्हणजे दुप्पट श्रम: संस्कृत व्याकरणाचे आ-कलन आणि पाणिनीय परिभाषा-तंत्राचे अवगमन. मी सरळ आंग्ल लेखक टी. बरो. (T. Burroh) यांचे ऑक्सफर्ड विद्यापीठाने प्रकाशित केलेले "The Sanskrit Language"या पुस्तकाचा पुरस्कार करीन,

पंडित आवळीकर कन्नड, संस्कृत, मराठी (आंग्ल व हिंदी अर्थातच) एवढेच नाही तर 'रशियन' जाणणारे. खास रशियात जाऊन झोकदार रशियन शिकले. त्यांनी अलेक्झांडर पुश्किन हा रशियन लेखक (१७९९-१८३७) जो 'स्वातंत्र्य' आणि 'प्रेम' यांचा पठ्ठेबापुराव म्हणून मानला जातो त्याच्या, पुश्किनच्या, कलाकृतींचा अनुवाद मोहरेदार छपाईत कॉन्टिनेन्टल प्रकाशनने मुद्रित केला.

शेक्सपिअर, थॉमस हार्डी, आंग्ल रोमॅन्टिक कवी, टॉलस्टाय, पुश्किन येवढेच काय तर जपानी हायकू, कन्नड कादबंऱ्या, बंगाली व हिंदी साहित्याचा मराठी अवतार हा साहित्यापुरता भाग झाला. साहित्य-शास्त्र म्हणायचे तर नागपूरचे प्रा. देशपांडे (संस्कृत साहित्य शास्त्र), रा. श्री. जोग (अभिनव काव्यप्रकाश) श्री. के. क्षीरसागर यांचे आंग्ल-संस्कृत परिशीलन मराठीला पूरक ठरले. डॉ. रा. शं. वाळिंबे यांचा अर्धा शेक्सपिअर पाठ होता. रोमँ रोलँचे सदर्भ ते सातत्याने त्यांच्या ऐटदार भाषेत द्यायचे. "मराठीला स्वत:चे असे साहित्यशास्त्र आहे का?" नागपूरच्या कुलकर्णी या प्राध्यापक समीक्षक दाम्पत्याने काही प्रयत्न निश्चित केले; पण संस्कृत व आंग्ल यांची टक्केवारी किती व अस्सल मराठीची किती? शंभराहून अधिक वर्षे ब्रिटिशांनी राज्य केल्यावर आमचे सर्वपल्ली राधाकृष्णन्, महात्मा गांधी, नामदार गोखले, पंडित नेहरू यांचे आंग्ल वचन-लेखन आदर्श ठरू लागले. भारतीय संस्कृतीच्या पृष्ठभूमीवर कविता कोकिळा Govind, Govind, Govind, Govind! How gently the river was flowing! अशासारख्या आंग्ल कविता रचू शकल्या. स्वातंत्र्यवीर सावरकरांचे इतर विचार मी मानतो पण 'भाषाशुद्धीचा' आग्रह मला पटत नाही.

"ते आम्ही परवाङ्मयातील करू चोरून भाषांतरे" ही आचार्य अत्र्यांनी उडवलेली खिल्ली मान्य करू. पण 'प्रतिभा-साधन'सारखा अमोल अलङ्कार, ना. सी. फडके यांच्यामुळेच मराठीला लाभला हे सत्य आहे. संस्कृतात उक्ती आहे' नास्ति चौर: कविजन" व नास्ति अ-चौर:, कविजन'

कालिदासाने वाल्मीकींच्या कित्येक उपमा सजवल्या आहेत. गुणाढ्याच्या 'बड्ड-कहाई' मधून अनेक नाट्यांचे मूलस्त्रोत आढळतात. महाभारताबाबत तर "इदं हि कविमुख्यानामाख्यानमुपजीव्यते" हे बाणभट्ट म्हणाला त्याहीपेक्षा खरे आहे.

आज परिस्थिती काय आहे? ब्रिटिश अमदानीमुळे मुळातली भारतीय राज्यघटना इंग्रजीत आहे. न्यायालयात इंग्रजीत न्याय दिला जातो. मराठीवर इंग्रजीचा प्रभाव ठायी ठायी आढळतो. इंग्रजी प्रश्नपत्रिकेचा मराठी अनुवाद देऊनही संशय आल्यास मूळ-आंग्ल तरजुमा योग्य मानला जातो. 'सहज'पणे मराठी कवितेत मराठीच असल्यासारखे आंग्ल शब्द आपण रसिकतेने स्वीकारतो. 'प्रेम म्हणजे, प्रेम म्हणजे प्रेम असते. तुमचे आणि आमचे अगदी 'सेम' असते.' हा 'सेम'



अनुक्रमणिका

जर सम-समान' या मराठी तत्समाना इतका जवळचा असला तर ह्या नात्यातल्या शब्दाला 'आपल्यात' घ्यायला काय हरकत आहे.

इंग्रजीमुळे मराठीचे भवितव्य धोक्यात नाही. इंग्रजी व मराठी यांचा 'गंगा-यमुनी' जोड प्रवाह हवा. 'संस्कृत-प्राकृत-मिश्रित' तशी मराठी-आंग्ल-मिश्रित कन्या भावनिक ऊबच देईल.

या नंतर राहिला खासा वर्ग ज्याचा आपल्या ठिकाणी 'भाव' आहे. हे कोणीच असूनही मान्य करणार नाही. मराठीची मायबोली म्हणून अस्मिता आणि आत्मीयता आहे म्हणून नव्हे तर पु. लं.च्या 'नारायणा'प्रमाणे इंग्रजांपेक्षा इंग्रजीवर (ती भाषा येत नाही) म्हणून राग असणाऱ्यांचा! ''हाथी अपनी चाल चलता है... एवढेच!

मी वस्तुत: 'संस्कृतचा' पण जिथे शक्य असेल तिथे मी संस्कृत तत्समाऐवजी मराठी शब्द पर्याय योजतो. 'गं. ना' ज्याला 'संस्मरणीय' व्याख्यान म्हणायचा त्याला मी 'कायमचे लक्षात राहील' असे व्याख्यान' म्हणायचो. प्राध्यापिका वाग्वैद्या विजयाताई राजाध्यक्ष संमेलनाध्यक्ष झाल्या. पहिलां मान 'कसबा गणपतीचा' या प्रथेनुसार पहिला सत्कार म.सा.प.त झाला. आपल्या शिक्षिकेविषयी बोलताना सौ. मनीषा दीक्षित म्हणाल्या ''बाईंनी आम्हाला असे 'पाथेय' दिले आहे, तर सौ. वीणा देव बाईच्या गरभारपणा विषयीच्या लेखाचे आत्मानुभवाने समर्थन करताना म्हणाल्या मी ज्यावेळी 'गर्भवती' होते. मराठी जनहो 'शिंदोरी' आणि 'गरोदर'हे मराठीच शब्द आहेत ना! तर शिव्याही मराठीत द्या.'' संस्कृतऐवजीही शक्य तेथे खास मराठीच शब्द वापरा. मराठी माय कायमची टिकेल..

◇◇◇

**प्रा. (वाग्वैद्य) मो. गो. धडफळे,**
भांडारकर प्राच्यविद्या मंदिर
पुणे ४११००४

---

## १ एप्रिल २०१० पासूनचे आजीव सभासद

१३०) विंचुरकर शिरीष जगन्नाथ
१३१) सोनवणे संजय डिंगबर
१३२) मोरे पांडुरंग दोघू
१३३) कोनकर रमण जगन्नाथ
१३४) पाटील उमेश भैय्यासाहेब
१३५) शिंपी आनंद काशिनाथ
१३६) कुसुरकर चंद्रशेखर श्रीकृष्ण
१३७) सुर्यवंशी विजयसिंग भिमसिंग
१३८) अमृतकार चिंधा नथू
१३९) निकम मालती अरुण
१४०) शेटे सुरेखा रमेश
१४१) आढाव गणेश ज्ञानेश्वर
१४२) पाटील सुषमा जयंत
१४३) तेली भटू कौतिक
१४४) कुलकर्णी आर. जी., सांगली
१४५) कुलकर्णी प्रल्हाद वासुदेव, सांगली
१४६) शहा सुमेधा, सांगली
१४७) सुरेश पंडित, सांगली
१४८) चौगुले उदय प्रमोद, सांगली
१४९) वेलणकर उदय, सांगली
१५०) बेंद्रे यशवंत शिवाजीराव, सांगली
१५१) सोनवणे सुरेखा मोहन, सांगली
१५२) निघोजकर प्रिया प्रदीप, देहूरोड
१५३) मेथवडे पुष्पा भास्कर, बारामती
१५४) भालेराव कविता अरुण,, पुणे
१५५) पाटील विनय भास्कर, जामगांव
१५६) फुलफगर महेंद्र, लासलगांव
१५७) बोरनर भागवत,लासलगांव
१५८) पवार सागर रावसाहेब, येवला
१५९) आहेर सुजाता यशवंत, विंचूर
१६०) पवार सोमनाथ, पिंपलगांव
१६१) भजक मृण्मयी हर्षल, पुणे
१६२) घारपुरे वैजयंती, चिंचवड
१६३) रत्नपारखी अनघा, निगडी
१६४) वैद्य अविनाश, चिंचवड
१६५) वैद्य मनाली अविनाश, चिंचवड
१६६) देशमुख वैभव नामदेव, माळवाडी
१६७) शिरवाडकर स्वाती, पुणे
१६८) जगताप पांडुरंग दिनकर, भोहिंड
१६९) मांडवे सुनील गोरखनाथ, पुणे
१७०) नावडकर रमेश काशिनाथ, पुणे
१७१) फडतरे पल्लवी दिनेश, पुणे
१७२) नावडकर सुरेश काशिनाथ, पुणे
१७३) पवार प्रियाल किरण, पुणे
१७४) पवार तन्मय किसन, पुणे
१७५) फडतरे दिनेश आनंदराव, पुणे
१७६) राऊत श्याम गणपत, शिनोली
१७७) पिंगळे विकास दामोदर, पुणे



अनुक्रमणिका

पुस्तक-परीक्षण

# जागतिकीकरणाच्या प्रक्रियेतील मुक्त चिंतन : 'मी कुठल्याही क्षणी नसेन!'

– प्रा. डॉ. शिवाजीराव पाटील

'मी कुठल्याही क्षणी नसेन' हा प्रसन्नकुमार पाटील यांचा केशव मेश्राम यांची प्रस्तावना असलेला व अक्षरदीप प्रकाशन, कोल्हापूर यांनी प्रकाशित केलेला ६२ कवितांचा आठवा काव्यसंग्रह होय.

स्वानुभवाचे सच्चेपण प्रकट करणारी ही कविता आहे. अल्पाक्षररमणीयत्व हे या कवितेचे खास वैशिष्ट्य आहे.

'ग्लोबलायझेशन : सहा छेद' या काव्यसंग्रहाच्या शेवटी असलेल्या कवितेतून विज्ञानयुग आणि अध्यात्म यांच्यातील परस्पर-संबंध, त्याबरोबरच जागतिकीकरणाच्या प्रक्रियेत अध्यात्माची होत चाललेली गळचेपी पाटील यांनी अत्यंत खेदाने नमूद केली आहे. शेतकऱ्यांना उद्ध्वस्त करू पाहाणाऱ्या 'सेझ'चा ठेकेदार खुद्द संत नामदेव झाला असून, 'चॅनेल'च्या गर्दीमध्ये टाळ हद्दपार झाल्याची सलही व्यक्त होते. ज्ञानेशाची विराणी लोप पावत आहे. एकनाथ शेअर-बाजाराचा भाव विचारायला लागला असून, रामदास आणि तुकोबांचा तर पत्ताच नाही. 'ग्लोबल'च्या वाटेवर बुका सांडला आहे. आख्या गोकुळाचे 'ग्लोबलायझेशन' झालेले पाहून कन्हैयाची मुरली 'रेमिक्स'मध्ये कुंथत आहे. हे सारेच चित्रण वाचकाला अंतर्मुख होऊन विचार करायला लावणारे आहे.

पाश्चात्त्य संस्कृतीचे वारे सर्वत्र वाहू लागले आणि आजची तरुण पिढी त्याला बळी पडताना दिसते. देशीयतेच्या मुळावर उठलेली 'मॉलची' आक्रमी पिल्लावळ कवीला विघातक वाटते. इथे साम्राज्यवाद, वसाहतवाद, चंगळवाद, मोर्चावाद प्रचंड प्रमाणात बोकाळला आहे. अशा वेळी कवी मात्र स्वत:च्याच दुकानात परका होऊन गुडघ्यात पाय घालून बसला आहे. याच वेळी पाटील यांची कविता 'कवितापण' हरवून उदास...एकाकी...व भयग्रस्त....! बनली आहे.

जो तो स्वार्थी, मतलबी बनला आहे. कुठेही बेंबीपासून आर्त स्वर उमटत नाहीत. प्रत्येकाने हरतऱ्हेचे मुखवटे चेहऱ्यावर चढवले आहेत. आजची पिढी दिशाहीन बनली आहे. या पार्श्वभूमीवर दिशाहीन पावलांची 'मॅरेथॉन' शर्यत ऊर फुटेस्तोवर धावणाऱ्या या पिढीचे पुढे काय होणार? याची चिंता वाटणे स्वाभाविकच आहे. म्हणून कवी म्हणतो-

*'ग्लोबल' होण्याचा पिसाट ध्यास*
*मातीच्या मूळ गंधाचे विस्मरण*
*सर्वत्र बाजारपेठांची तुफान गर्दी आणि*
*'शोकेस'मधल्या विठ्ठलाचे विराट एकाकीपण...!'*

रोजगार हमीवरील मजुराला 'ग्लोबलायझेशन' म्हटले की, गलबलायला होते. उदार आर्थिक धोरणाच्या मोर्च्यासाठी आलेल्या मोलकरणीची 'उधारी' वाढते. या 'मॉल'ने तर एका किरकोळ विक्रेत्याचा सारा मालच नासवला आहे. हा 'सेझ' म्हणजे आपल्या आईवर बलात्कार करणारा क्रूर पुरुष असे शेतकऱ्यांना वाटते. तेव्हा हे जागतिकीकरण की 'सामान्यांचे अगतिकीकरण'...?



प्रस्तुत कवी आशावादी असल्याचे द्योतक 'उजेडाचा गाव', 'पाखरे', 'दिवे लावा रे' या कवितांतून व्यक्त होतो.





अनुक्रमणिका

आजच्या जीवनप्रवाहात कुठे स्वागत नाही, कुठे सत्कार नाही. दरेक पावलाला दु:खाचे लाखो सलाम होते. असे असहाय जीवन जगणे मात्र भाग होते. त्यांचे कुत्सित हसणेही होते.

जिकडे-तिकडे तळीच होती. गुन्हा केला नाही तरी सजा मात्र भोगावी लागत होती. न झुकणाऱ्या मानेवर तलवारीचे पाते होते-

*'तरी लढाई हरलो नाही जय केवळ माझा होता*
*अवघ्या बांधवासमोर आता उजेडाचा गाव होता...!'*

एकूणच काय, तर या दु:खी-कष्टी मानवांच्या जीवनात एक ना एक दिवस प्रकाश येईल; आणि त्यांचे जीवन सुखी होईल, अशी आशा केली आहे. 'पाखरे' या कवितेतून बंदिस्त पाखरांच्या डोळ्यांत एक दिवस लाल विखार निर्माण होईल आणि त्यांच्या 'मिसाईली' मुठीने पक्षी गजमुसंडी मारून मुक्त होतील अशी आशा व्यक्त केली आहे. ज्ञानेश्वर आणि गांधी थकले असून माणुसकीची विटंबना चालू आहे. सर्वत्र होणाऱ्या घातपातांनी आणि भू-स्फोटांनी उरात धडकी भरली आहे. सर्वत्र कंपित वारे सुटले आहेत. अशा वेळी गरुडभरारी घेऊन मनामनांतून व दिशादिशांतून दिवे लावून आपले जीवन प्रकाशमान करण्याचा आशावाद, पाटील व्यक्त करतात.

'ग्लोबलायझेशन'च्या युगातील बाजारपेठेला कवी दु:खे विकत घेणारी आणि दु:खे विकणारी बाजारपेठ असे संबोधतो, तर तनामनावर मीडियांचे राजरोस नित्य होणारे बलात्कार, विरळ होत गेलेली नाती आणि शेवटी शरीर केवळ भोगयंत्रच बनते, हे दुखणेही व्यक्त होते.

'सांज उतरावी', 'निघालीस', 'घर झाले', 'अखेर तूही', 'गाणे', 'बांध पायी पैंजणे' आणि 'वक्षातून कळ' या पाटील यांच्या प्रीतिभाव जागवणाऱ्या कविता आहेत.

'शब्द', 'विठूचा पालव-शब्दातून', 'शब्दांनो', 'कवितेनं' उपरोक्त कवितांतून शब्दांचे महत्त्व व्यक्त होते. शब्द म्हणजे ईश्वराच्या मूर्ती मानून कवी म्हणतो- 'मी शब्दांनाच श्वास दिले आहेत.' तर दुसऱ्या बाजूला शब्दांना वाळवी लागली असून कवींची कुळे ओस पडल्याची खंतही व्यक्त केली आहे. या शब्दांनीच पाठीवर वळ दिले असून, जगण्याचे बळही दिले आहे. विठूचा पालव शब्दांतून दाटत असून अवघे अस्तित्वच शब्दांत साठले आहे. हे शब्द कवीला कधी प्रौढ, उमलोत्सुक, ज्ञानेश्वरी, शिवनेरी वाटतात. तर कधी 'इंटरनेटी', 'क्लिटनी', 'मुशर्रफी' वाटतात. गंधर्वाच्या गळ्यातील वयात आलेली तान असेही शब्दाचे महत्त्व पाटील यांनी व्यक्त केले असून, शब्द म्हणजे 'यक्षिणीच्या डोळ्यांतील नाचरी इंद्रकमान' असेही म्हटले आहे.

एकूणच या दुनियेच्या बाजारपेठेत वस्तूंसोबतच स्वत:ला विकणारा स्वार्थी, मतलबी माणूस प्रसन्नकुमार पाटील यांच्या कवितेच्या चिंतनाचा विषय आहे. 'माणुसकीचा व सांस्कृतिक मूल्यांचा ऱ्हास करीत, संवेदना हरवलेल्या या विद्यमान जगात वर्तमानाबरोबर भविष्याच्याही चिंधोट्या होताना पाहून पाटील कातर होतात. हे माणसांचे उणावणे कवीने ताकदीने शब्दबद्ध केले आहे. काव्याच्या माध्यमातून स्वत:ला शोधता शोधता समग्र मानवतेची वाटचाल त्यांनी समर्थपणे नोंदविली आहे. राम, कृष्ण, गौतम, गांधी, आंबेडकरांच्या मातीत, माणसांचा भुगा झालेला पाटील यांना पाहावत नाही. घडणाऱ्या आणि मोडणाऱ्या माणसांचे अनेकविध रंगतरंग आणि बदरंगही त्यांनी भावबद्ध केले आहेत,' असे प्रस्तावनाकार केशव मेश्राम म्हणतात; ते खरेच आहे. 'मी कुठल्याही क्षणी नसेन'मधील पाटील यांची कविता काव्यरसिकांना नवा श्वास देईल याची मला खात्री वाटते.

❖❖❖

**प्रा. डॉ. शिवाजीराव पाटील**
एम. ए. एम. फिल, पीएच. डी.
मराठी विभागप्रमुख
कला महाविद्यालय, कोवाड
ता. चांदगड, जि. कोल्हापूर
चलभाष - ९४२२८५४७७१

श्रद्धांजली

# कवी : दत्ताजी हलसगीकर

– डॉ. इरेश स्वामी



वर्णमालेत उशिरा येणाऱ्या वर्णाप्रमाणे 'ह'लसगीकर हे माझ्या आयुष्याच्या पंचेचाळिशीनंतर भेटले. एक मनस्वी माणूस. आत-बाहेर अखंड एक असणारा आख्खा माणूस. ज्यांच्या अभिव्यक्तीत भावनांचा महापूर असे. ज्यांचे ओठ आणि डोळे बोलके. अंत:करणाला वाट शब्दांतून आणि अश्रूंतून फुटे. त्यांचं बोलणं अकृत्रिम. त्यांची कविता सहज उत्स्फूर्त. जिला अलंकाराचा सोस नव्हता. नटण्या-मुरडण्याची हौस नव्हती. भू-गर्भातल्या जिवंत झऱ्यासारखी झुळझुळणारी त्यांची कविता सर्वांना सुखावणारी होती. त्यांची प्रत्येक कविता असे, सरळ, सुबोध, सोपी! ते म्हणत सामान्यांच्या आकलना-पलीकडची अत्यंत उंचीची कविता, कळण्या पलीकडची असेल तर तिचा काय उपयोग? शब्दकोषाशिवाय सहज संवादित्व हे काव्याचं खरं लक्षण होय. त्यांच्या काव्याचा विषयच मुळी आर.के. लक्ष्मण या श्रेष्ठ व्यंग चित्रकाराच्या चित्रासारखा 'सामान्य माणूस' होता. त्यामुळे प्रत्येकांना त्यांच्या कवितेत, स्फुट लेखांत आपलं रूप दिसे. आपली व्यथा आपलं सुख शब्दबद्ध झालेलं दिसे.

आईचं अंत:करण असणारा. आईची सेवा करणारा. हळुवार मनाचा कवी. सकाळी जोडीने फिरायला जाणारे अनेक पण आईला सोबत घेऊन तिच्या संथ चालीशी आपली गती मंद करून चालणारा हा मातृभक्त माणूस मी माझ्या डोळ्यांत, अंत:करणात कायम साठवून ठेवला आहे. दत्ताजींचं आजोळ कर्नाटकातलं. आईशी माझी ओळख मुद्दाम कानडीतून करून दिली होती. त्यांना वाकून नमस्कार करताना माझी आईच वाटायच्या त्या.

वहिनींशी ओळख करून देताना 'हे पंढरपुरचे बरं का?' म्हणून आणखी मित्रत्वात जवळीक निर्माण करून दिली होती. माझ्या घरी आईशी सौ. स्वामी बाईशी ते कानडीतून संवाद साधत. त्यामुळे दत्ताजी माझ्या परिवाराला अत्यंत जवळचे झाले होते.

ब्रह्मचैतन्य सोसायटीत दत्ताजींना त्यांच्या कवी मित्रांसह आमंत्रित केले. त्यावेळी लक्ष्मीनारायण बोल्ली, चंद्रभूषण कुलश्रेष्ठ, नारायण काका कुलकर्णी प्रसिद्ध मंडळींनी सोसायटीतल्या रसिकांना दर्जेदार कविता ऐकविल्या होत्या. महाराष्ट्रातल्या दर्जेदार मासिक, त्रैमासिक, दिवाळी अंकांमधून दत्ताजी मराठी वाचकांच्या घरोघरी पोहोचले होते. पाठ्यपुस्तकात त्यांच्या काव्यगुणांमुळे त्यांना स्थान मिळाले होते. महाराष्ट्राच्या सीमा ओलांडून बृहन्महाराष्ट्रात ते पोहोचले. देशाच्या सीमा उल्लंघून दादांनी तिथल्या रसिकांनाही आपल्या काव्याने भुरळ घातली.

मध्यमवर्गीयांमध्ये, राबणाऱ्यांच्या सोबत वाढलेल्या दत्ताजींना त्यांच्या व्यथेनं लिहितं केलं. कोणाला सांगावं, बोलावं अशी घुसमट झाली की कवी शब्दांशी संवाद साधतो; आणि ती प्रामाणिक अभिव्यक्ती भाव-भावनांची भावकांशी जवळीक करून देते कवीची.

सोलापुरात आल्यानंतर सुरुवातीला साहित्य क्षेत्रातील कवी संजीव, कविवर्य रा.ना. पवार, डॉ. निर्मलकुमार फडकुले, प्रा. त्र्यं.वि. सरदेशमुख, पक्षीमित्र श्री.बी.एस्. कुलकर्णी, दत्ता हलसगीकर, शरद एकबोटे यांच्याशी ओळख झाली. साहित्यिक गोष्टींमध्ये उपस्थित राहू लागलो. माझ्या प्रारंभीच्या महाराष्ट्र राज्य साहित्य



अनुक्रमणिका

संस्कृती मंडळाकडून अनुदानित ग्रंथांच्या 'शब्दकळा', 'हेलपाटा' त्यानंतर स्वर्गीय य.दि. फडकेंच्या हातून प्रकाशित 'हिरवी अक्षरं' ललित ग्रंथाच्या वेळी दत्ताजींनी मला दिलेलं प्रोत्साहन मी विसरलो नाही. त्यांच्या मैफिलींचा आनंद घेतला आहे. इतरांना सोबत घेऊन त्यांच्या लिखाणाला प्रोत्साहित करणारं, लिहितं करणारं दुर्मिळ वडीलधारं व्यक्तित्व आज आपल्यात राहिलं नाही; याची खंत मनाला उदास करून देते.

सोलापूर विद्यापीठाची स्थापना झाल्यानंतर त्यांच्या प्रतिभासंपन्न काव्याला सन्मानित करण्याची संधी मी घेतली. दादांनी नव्या क्षेत्रीय विद्यापीठाला साजेसं सुंदर 'विद्यापीठ गीत' लिहून दिले. सोलापूर विद्यापीठाच्या इतिहासात दादांचं नाव चिरकाल राहील.

रससिद्ध कवीच्या यशरूपी शरीराला जरा आणि मरण असत नाही; असं सुभाषित प्रसिद्ध आहे. त्या सुभाषितानुसार आज दादा शरीराने आपल्यात नसले तरी त्यांच्या काव्यामुळे ते आजदेखील आपल्यात आहेत; आणि पुढेही असणार आहेत.

*''जयन्ति ते सुकृतिने रससिद्धा कविश्वरा*
*नास्ति येषां यशःकाये जरा मरणज भयम्''*

दादांच्या स्मृतीला अभिवादन!

◇◇◇

**डॉ. इरेश स्वामी**
'विद्या' १२, ब्रह्मचैतन्य नगर, विजापूर रोड,
सोलापूर, ४१३००४.

---

## १ एप्रिल २०१० पासूनचे आजीव सभासद

१७८) वागुल मिलींद विनायक, जामगांव
१७९) दातार धनंजय विजय, पुणे
१८०) पाठक सुधीर श्रीधर
१८१) गुगळे सुनील कांतीलाल
१८२) काळे विश्वास गणपतराव
१८३) काळे पोपटराव मारुती
१८४) वऱ्यादर प्रकाश विष्णूपंत
१८५) मोडक शिरीष दामोदर
१८६) खान तन्वीर मुनीस
१८७) गोरे संतोष लक्ष्मण
१८८) फडणीस अनंत रामचंद्र
१८९) फडर्णीस मेघना अ.
१९०) शिंदे शाम वसंत
१९१) काळे उदय यशवंत
१९२) हसमनीस अ. श्रीनिवास, सातारा
१९३) डहाके वसंत आबाजी, अमरावती
१९४) माने प्रशांत वसंतराव, जुने सोलापूर
१९५) कडलासकर मुरलीधर ज्ञानदेव, सोलापूर
१९६) जोशी शिरीष महादेव, सोलापूर
१९७) अंदारे अरविंद भास्कर, सोलापूर
१९८) जोशी आनंद शशिकांत, सोलापूर
१९९) मेतन व्यंकटेश सिद्रामप्पा, सोलापूर
२००) इंदापुरे संजीव लक्ष्मणराव, सोलापूर
२०१) म्हैत्रसे ललन तुकाराम, सोलापूर
२०२) चावरे मार्तंड लक्ष्मण, सोलापूर
२०३) मेते संजीवकुमार शिवशंकर, सोलापूर
२०४) अक्कलवाडे माणीक रामचंद्र, सोलापूर
२०५) हिरेमठ शांताकुमार रूदया, सोलापूर
२०६) पिसे राकेश अनिल, भिवंडी
२०७) आचार्य हेमंत जगन्नाथ, भिवंडी
२०८) वडके माधुरी मार्तंड, भिवंडी
२०९) टिंगरे पाटील विकास शिवाजी, पुणे
२१०) शिंदे शरदराव बबनराव
२११) वाळुंज लक्ष्मण झंबरहाडे
२१२) आयटेकर जयश्री अनिल
२१३) बाणखेले वसंत विष्णू
२१४) घुले शांता रामजी
२१५) बाणखेले पांडुरंग बबनराव
२१६) पायमोडे सतीश अशोकराव
२१७) पायमोडे कार्तिक अशोकराव
२१८) गवारे चंद्रकांत छबुराव
२१९) लोंढे देवराम गेणुजी
२२०) वळसे पाटील संतोष काशीनाथ
२२१) पाध्ये प्रसन्न यशवंत, पुणे
२२२) बाविसकर विजय मधुकरराव, पुणे
२२३) मुरकुटे वंदना ज्ञानेश्वर, पुणे
२२४) चौधरी प्यारेलाल सजनलाल, पुणे
२२५) चौधरी निरज प्यारेलाल, पुणे
२२६) चौधरी किरण प्यारेलाल, पुणे
२२७) चौधरी अक्षय प्यारेलाल, पुणे
२२८) काकडे श्रीकृष्ण गोविंदराव, पुणे
२२९) मोलावडे हणमंत सीताराम, पुणे
२३०) मोहिते राजेन्द्र आनंदराव, पुणे
२३१) मोहिते सुभाष शामराव, पुणे
२३२) खांडेकर दादासाहेब सुखदेव
२३३) कांबळे सुहास महंत्तपा
२३४) शेख फय्याज युसुफ
२३५) जाधव उदय रामचंद्र, खराडी
२३६) खाचणे विमल मधुसुदन, पुणे
२३७) देशपांडे नंदित रा., पुणे
२३८) कुलकर्णी अंजली राधाकृष्ण, चिंचवड
२३९) पुलावले सुभाष सदाशिव, दिघी
२४०) मटाहेरकर प्रशांत वसंत
२४१) दळवी माणिक, भिवंडी

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०
## विश्वस्त, अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्यकारी मंडळ (२०११ ते २०१६)

| | |
|---|---|
| १) अॅड. भास्करराव आव्हाड | विश्वस्त अध्यक्ष |
| २) प्रा. डॉ. शिवाजीराव कदम | कार्यकारी विश्वस्त |
| ३) आ. उल्हासदादा पवार | विश्वस्त सदस्य |
| ४) प्रा. द. मा. मिरासदार | अध्यक्ष (फेब्रुवारी २०१२ पर्यंत) |
| ४) डॉ. प्र. चिं. शेजवलकर | अध्यक्ष (मार्च २०१२ पासून) |
| ५) डॉ. रावसाहेब कसबे | उपाध्यक्ष |
| ६) डॉ. द. ता. भोसले | उपाध्यक्ष |
| ७) श्री. चंद्रकांत शेवाळे | उपाध्यक्ष |
| ८) डॉ. माधवी दिलीप वैद्य | कार्याध्यक्ष |
| ९) प्रा. मिलिंद गोविंदराव जोशी | प्रमुख कार्यवाह |
| १०) श्री. सुनील प्रभाकर महाजन | कोषाध्यक्ष |
| ११) डॉ. सु. प्र. कुलकर्णी | संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका |
| १२) श्री. दीपक कृष्णाजी करंदीकर | स्थानिक कार्यवाह क्र.१ (व्याख्याने व स्मृतिदिन) |
| १३) श्री. प्रकाश वाळकृष्ण पायगुडे | स्थानिक कार्यवाह क्र.२ (विशेष पारितोषिके) |
| १४) नंदा सुर्वे | स्थानिक कार्यवाह क्र.३ (वार्षिक ग्रंथपारितोषिके) |
| १५) सौ. सुनीताराजे किसन पवार | स्थानिक कार्यवाह क्र.४ (परीक्षा विभाग) |
| १६) महेंद्र मुंजाळ | स्थानिक कार्यवाह क्र.५ (ग्रंथालय विभाग) |
| १७) अॅड. प्रमोद ज्ञानेश्वर आडकर | स्थानिक कार्यवाह क्र.६ (वास्तू, अतिथीनिवास देखभाल) |
| १८) डॉ. कल्याणी दिवेकर | पुणे शहर प्रतिनिधी |
| १९) डॉ. अरविंद संगमनेरकर | पुणे शहर प्रतिनिधी |
| २०) डॉ. सतीश देसाई | पुणे शहर प्रतिनिधी |
| २१) डॉ. सु. प्र. कुलकर्णी | अहमदनगर जिल्हा प्रतिनिधी |
| २२) मेधा यशवंत काळे | अहमदनगर जिल्हा प्रतिनिधी |
| २३) डॉ. पुरुषोत्तम दत्तात्रय काळे | पुणे जिल्हा प्रतिनिधी |
| २४) श्री. राजन बाबुराव लाखे | पुणे जिल्हा प्रतिनिधी |
| २५) श्री. पद्माकर मा. कुलकर्णी | सोलापूर जिल्हा प्रतिनिधी |
| २६) अॅड. जयंत जगन्नाथ कुलकर्णी | सोलापूर जिल्हा प्रतिनिधी |
| २७) डॉ. किसन पाटील | जळगाव जिल्हा प्रतिनिधी |
| २८) रविंद्र वेडकिहाळ | सातारा जिल्हा प्रतिनिधी |
| २९) श्री. पांडुरंग केशव दातार | ठाणे जिल्हा प्रतिनिधी |
| ३०) श्री. प्रभाकर अनंत संत | ठाणे जिल्हा प्रतिनिधी |
| ३१) श्री. पद्माकर शिरवाडकर | ठाणे जिल्हा प्रतिनिधी |
| ३२) श्रीमती प्रतिभा पु. लिमये | रत्नागिरी, रायगड जिल्हा प्रतिनिधी |
| ३३) श्री. राजन मुठाणे | कोल्हापूर जिल्हा प्रतिनिधी |
| ३४) श्री. प्रकाश केदूजी होळकर | नाशिक जिल्हा प्रतिनिधी |
| ३५) डॉ. शशिकला पवार | धुळे, नंदुरबार जिल्हा प्रतिनिधी |
| ३६) वृषाली विलास आफळे | सांगली जिल्हा प्रतिनिधी |
| ३७) श्री. श्याम जोशी | स्वीकृत सदस्य |
| ३८) श्री. उद्धव कानडे | स्वीकृत सदस्य |

◇◇◇



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शहर कार्यवृत्त नोंद
(१ जून २०१२ ते ३० सप्टेंबर २०१२)

## — पुणे शहर —

**१) दि. २६ जून २०१२ : नवं कोरं :** या उपक्रमांतर्गत डॉ. राजेंद्र माने यांच्या 'न लिहिलेली आत्मकथा' या कथासंग्रहावर चर्चा आयोजित करण्यात आली. ज्येष्ठ साहित्यिक श्री. ह. मो. मराठे प्रमुख पाहुणे होते, तर प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी हे प्रमुख वक्ते होते.

**२) दि. २९ जून २०१२ : कॉफी क्लब :** या उपक्रमांतर्गत प्रतिभाताई शाहू मोडक यांच्याशी गप्पांचा कार्यक्रम झाला.

**३) दि. ४ जुलै २०१२ : श्रद्धांजली सभा :** भा. द. खेर, मु. श्री. कानडे व दत्ता हलसगीकर या दिवंगत साहित्यिकांना श्रद्धांजली वाहण्यासाठी सभा झाली. सभेचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर होते. जयराम देसाई, डॉ. न. म. जोशी, अनिल कुलकर्णी, डॉ. अरविंद कुलकर्णी, डॉ. चंद्रशेखर बर्वे, प्रा. मिलिंद जोशी, डॉ. अशोक रामचंद्र कानडे, विवेक वाडेकर, राजेंद्र खेर, डॉ. वि. दा. कराड या वक्त्यांनी श्रद्धांजलीपर भाषणे केली. यानंतर अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी समारोप केला. याचवेळी प्रा. डॉ. राम बापट व ज्येष्ठ पत्रकार रामभाऊ जोशी यांच्या पत्नी या सर्व दिवंगतांना दोन मिनिटे उभे राहून श्रद्धांजली वाहण्यात आली. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी श्रद्धांजली सभेचे संचालन केले.

**४) दि. २० जुलै २०१२ : थोर कथाकार जी. ए. कुलकर्णी जयंती :** मसाप व जी. ए. कुटुंबीय यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित केलेल्या जयंती कार्यक्रमात प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक केले. नंदाताई पैठणकर यांनी कार्यक्रमामागची भूमिका सांगितली. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते अनुराधा कुबेर, किरण मोघे, महेश आफळे, विनोद पावशे, नारायण गणाचारी, वामन राघोकर या कलाकारांचा सत्कार करण्यात आला. अनुराधा कुबेर व किरण मोघे यांनी जी.एं.ना आवडणारी काही गाणी सादर केली. उत्तरार्धात 'एक अधिक शून्य' ही जी. एं. च्या कथेवर आधारित एकांकिका ध्वनिचित्रफितीद्वारे दाखविण्यात आली. महेश आफळे व कस्तुरी आफळे यांचा सत्कार करण्यात आला. सूत्रसंचालन कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले.

**५) दि. २५ जुलै २०१२ : संत सावतामाळी स्मृतिदिन : आजीआजोबांच्या गोष्टी उपक्रमाचा प्रारंभ :** या कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी पुष्पगुच्छ देऊन रेणूताई गावसकरांचे स्वागत केले. काही मुलामुलींनी गेल्या वर्षीच्या शिबिरात शिकलेली काही गंमतगाणी यावेळी सादर केली. व्यासपीठावर कोषाध्यक्ष सुनील महाजन व प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी उपस्थित होते. त्यानंतर रेणू गावस्कर यांनी उपस्थितांसमोर कथाकथन केले. याचवेळी उपस्थित मुलामुलींना 'खाऊचे वाटप' करण्यात आले.

**६) दि. २६ जुलै २०१२ : नवं कोरं :** या उपक्रमांतर्गत प्रमुख कार्यवाह लेखक प्रा. मिलिंद जोशी यांच्या 'पानगळ' या पुस्तकातील काही कथांचे वाचन व चर्चा असा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. त्यांच्या हस्ते व्यासपीठावर भानू

काळे, गजानन परांजपे, नंदा सुर्वे, प्रा. मिलिंद जोशी, गोविंदराव जोशी, सुनीताराजे पवार, रविमुकुल यांना पुष्पगुच्छ देऊन सत्कार व स्वागत करण्यात आले. सुनीताराजे पवार यांनी प्रकाशिकेचे मनोगत व्यक्त केले. 'पानगळ' कथासंग्रहामागची लेखकाची भूमिका प्रा. मिलिंद जोशी यांनी विशद केली. भानू काळे यांनी पुस्तकासंबंधी विचार प्रकट केले. गजानन परांजपे व नंदा सुर्वे यांनी कथावाचन केले. सूत्रसंचालन उद्धव कानडे यांनी आणि आभारप्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले.

**७) दि. ३० जुलै २०१२ : नं. र. फाटक स्मृतिसन्मान पुरस्कार सोहळा :** या सोहळ्याचे प्रमुख पाहुणे मा. वसंत आबाजी डहाके होते. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी मान्यवरांचे स्वागत केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी डॉ. शेषराव मोरे यांचा परिचय करून दिला. वसंत आबाजी डहाके यांच्या हस्ते डॉ. शेषराव मोरे यांना न. र. फाटक स्मृती पुरस्कार देण्यात आला. डहाके यांनी आपले अध्यक्षीय मनोगत व्यक्त केले. त्यानंतर डॉ. शेषराव मोरे यांनी विचार प्रकट केले. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले.

**८) दि. ३१ जुलै २०१२ : कै. मामासाहेब तथा सोनोपंत दांडेकर पुरस्कार :** लेखक अच्युत गोडबोले यांच्या 'मनात' या पुस्तकाला परिषदेचे अध्यक्ष व कार्यक्रमाचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते हा पुरस्कार देण्यात आला. प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी केले. प्रा. मिलिंद जोशी यांनी उपस्थितांचे स्वागत केले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी अच्युत गोडबोले यांचा परिचय करून दिला. अध्यक्षांच्या हस्ते अच्युत गोडबोले यांना पुरस्कार देण्यात आला. त्यांनी आपले मनोगत व्यक्त केले. डॉ. शेजवलकरांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**९) दि. १३ ऑगस्ट २०१२ :** ८६ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, चिपळूण येथे होत आहे. त्याच्या 'बोधचिन्हा'चे प्रकाशन मसा परिषदेचे विश्वस्त आणि भारती विद्यापीठ विश्वविद्यालयाचे कुलगुरू प्रा. डॉ. शिवाजीराव कदम यांच्या हस्ते व महामंडळाच्या प्रतिनिधी डॉ. उज्ज्वला मेहेंदळे यांच्या उपस्थितीत झाले. या प्रसंगी डॉ. यतीन जाधव उपस्थित होते. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी स्वागत व प्रास्तविक केले. बोधचिन्ह संदर्भातील मनोगत अच्युत पालव यांनी केले. चिपळूणचे प्रकाश देशपांडे नगराध्यक्ष सावित्री होमकळस यावेळी उपस्थित होते. सूत्रसंचालन प्रकाश पायगुडे यांनी केले.

**१०) दि. १४ ऑगस्ट २०१२ : कै. डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृतिदिन :** डॉ. वसुंधरा पेंडसेनाईक यांना डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृती पुरस्कार देण्यात आला. यानिमित्ताने 'उपयोजित मराठी' या पुस्तकाचे प्रकाशन करण्यात आले. प्रा. सुजाता शेणई, संतोष शेणई, डॉ. केतकी मोडक यांनी हे पुस्तक संपादित केले आहे. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले.

**११) दि. २३ ऑगस्ट २०१२ : नवंकोरं :** डॉ. मधुरा कोरान्ने लिखितं 'मराठी नाटक आणि डॉक्टर प्रतिमा' 'या पुस्तकावर चर्चा व नाट्यवाचन आयोजित करण्यात आले होते. ज्येष्ठ अभिनेते डॉ. मोहन आगाशे प्रमुख पाहुणे होते. प्रा. मिलिंद जोशी, डॉ. स्नेहल तावरे, डॉ. मधुरा कोरान्ने, डॉ. गौरी दामले यांनी पुस्तकावरील चर्चेत भाग घेतला. 'सुंदर मी होणार' आणि 'डॉक्टर! तुम्हीसुद्धा' या दोन नाटकांतील निवडक भागांचे नाट्यवाचन श्रीधर कुलकर्णी, प्रा. वंदना जोशी, बिपीन पाळंदे, सुनीता कुलकर्णी यांनी केले. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी स्वागत व प्रास्तविक केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी प्रमुख पाहुण्यांचा परिचय करून दिला कार्यवाह नंदा सुर्वे यांनी डॉ. मधुरा कोरान्ने यांचा परिचय करून दिला.



अनुक्रमणिका

## म. सा. प. ठाणे जिल्हा शाखा

**१) दि. ३१ मार्च २०१२ :** प्रा. डॉ. अनंत देशमुख यांचे 'प्रो. र. धों. कर्वे : व्यक्ती आणि वाङ्मय' या विषयावर व्याख्यान झाले. याचवेळी श्री. उमाकांत वर्मा यांच्या 'छलांग' या कथासंग्रहाचे प्रकाशन झाले. 'हितवर्धिनी संस्थेचे' सहकार्य या कार्यक्रमास लाभले.

## म. सा. प. धुळे व नंदूरबार जिल्हा शाखा

**१) दि. २० ऑक्टोबर २०११ :** शाखेची पंचवार्षिक सर्वसाधारण सभा आयोजित करण्यात आली होती. सुलभाताई मानगांवकर सभेच्या अध्यक्षस्थानी होत्या. २०११-२०१६ साठी नवीन कार्यकारिणीची निवड करण्यात आली. अध्यक्ष : प्रा. अनिल सोनार, कार्याध्यक्ष मोहन मोरे, उपाध्यक्ष प्रा. रविकिरण झोळ व पापालाल पवार, कार्यवाह प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे, प्रा. सविता बहाळकर व कोषाध्यक्ष प्रा. विलास चव्हाण, तसेच सदस्य म्हणून सी. ब. रावळे, प्रा. उषा पाटील, प्रा. भगवान पाटील, विश्वनाथ मोराणकर, सुभाष अहिरे, प्रा. राजश्री शेलकर, सुमनताई महाले, प्रज्ञा निकुंभे, प्रभा वैकर यांची निवड करण्यात आली. स्वीकृत सदस्य प्रा. बी. महाजन व प्रा. उमेश शिंदे आणि धुळे जिल्हा प्रतिनिधी म्हणून प्रा. डॉ. सौ. शशिकला पवार यांची निवड झाली.

◇◇◇

**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
कार्यवाह, म.सा.प. पुणे.

## म. सा. प. अहमदनगर जिल्हा शाखा

अहमदनगरच्या स्नुषा कै. वंदना विटणकर यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ भावगीत लेखन आणि भावगीत-गायन स्पर्धा आयोजित केल्या होत्या. डॉ. बोपर्डीकर यांच्या स्वरानंद हॉलमध्ये यानिमित्त डॉ. गोपाळ मिरीकर यांनी आयोजित केलेला नगरच्या गायक-कलाकारांचा कार्यक्रमही झाला.

कवि ग्रेस यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी डॉ. चं. वि. जोशी यांच्या निवासस्थानी श्रद्धांजली सभा झाली. डॉ. सहस्रबुद्धे, डॉ. चं. वि. जोशी, प्रा. संतोष पवार, प्रा. मेधा काळे, श्री. टी. एन. परदेशी, डॉ. क्रांतिकला अनभुले इत्यादींची भाषणे झाली. श्री. अरविंद ब्राह्मणे आणि कार्याध्यक्ष श्री. चंद्रकान्त पालवे यांनी कवि ग्रेस यांच्या कवितांचे अभिवाचन केले.

म.सा.प., अहमदनगर आणि डॉ. सहस्रबुद्धे यांच्या आनंदोत्सव ट्रस्टतर्फे कवयित्री अरुणा ढेरे आणि प्रा. मिलिंद जोशी यांच्या समवेत साहित्य गप्पांचे आयोजन केले.

◇◇◇

**चंद्रकान्त पालवे**
कार्याध्यक्ष, म.सा.प. शाखा अहमदनगर

### १ एप्रिल २०१० पासूनचे आजीव सभासद

२४२) कानिटकर विश्वास कृष्ण, भिवंडी
२४३) अंद्रेकर प्रबोधन विजय
२४४) दुबे योगेश घनश्याम, मुंबई
२४५) पन्हाळे सविता, नाशिक
२४६) दास्ताने निरुपमा घन:श्याम, पुणे
२४७) सबनीस विवेक कृष्णराव
२४८) यादव जीवन मदन
२४९) कदम महिंद्र सुदाम
२५०) गांगजी सुनिल कुमार व्यंकटेश
२५१) बारड ओमप्रकाश ऊर्फ मोहन ज्ञानदेव
२५२) बागलकोट जितेन्द्र विश्शप्पा
२५३) दोशी बाहुबली हिराचंद
२५४) वाले सिधेश्वर धानच्या
२५५) मेहता महावीर शंकरलाल
२५६) करकधोंड दिगंबर रामचंद्र
२५७) तुपे सारीपुत्र आजीनाथ

◇◇◇



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

**Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : July to September 2012**
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57
*Book Pkt. Periodical Category*



बुक-पोस्ट

महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रेषक
**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.



